बळी अंधश्रध्देचे ह्या प्रस्तुत पुस्तकात शहाणी सुशिक्षित माणसेही कशी अज्ञान माणसासारखे वागु लागतात हे मार्मिकपणे दाखवून देण्याचा लेखकाने प्रयत्न केला आहे. अश्या माणसांना सुशिक्षित तरी कसे म्हणावे जे साधुबुवांच्या साध्या साध्या हातचलाख्यांना चमत्कार समजतात त्यांच्याकडे दैवी शक्ती आहे असे मानतात.

ह्या पुस्तकातील अंधश्रध्देच्या करुण कहाण्या आपल्यापर्यंत पोहचवून माणसाने माणुस म्हणुन जगण्यासाठी काय केले पाहीजे. हे सांगण्याचा प्रयत्न अनुभवाधिष्ठीत कथांमधून केला आहे ते वाचुन वाचक अंर्तमुख झाला तर लेखकाच्या लेखणीचे सार्थक होईल.



# बळी
# अंधश्रद्धेचे

जगदीश काबरे

मनोविकास प्रकाशन
प्रकाशन, मुंबई

# अनुक्रमणिका



# दोन शब्द ....

संपूर्ण पुस्तक लिहून झाल्यावरही लेखकाला 'दोन शब्द' लिहावेसे वाटतात. लेखकाला जे सांगावयाचे असते ते पुस्तकात सांगून झालेले असले; तरीही तो 'दोन शब्द' लिहिण्यास उत्सुक असतो.

मला वाटते या मागे त्याची काही एक विशिष्ट भूमिका असावी. पुस्तकात त्याने बऱ्याच गोष्टींचा ललितपूर्णतेने उहापोह केलेला असला, तरी हे पुस्तक लिहिण्यामागची प्रेरणा कोणती,त्याला त्याच्या वैचारिक मांडणीसाठी सदर पुस्तकाचा आधार घेण्याचे कारण काय इ. प्रश्नांची स्पष्टीकरणे या 'दोन शब्दांत' करावीशी वाटत असावी म्हणूनच त्याला 'दोन शब्दांची' गरज असते.

मी 'लोकविज्ञान चळवळीत' गेली काही वर्ष सातत्याने सक्रिय सहभाग घेतला आहे. या चळवळीच्या अनेक वैज्ञानिक उद्दिष्टांपैकी 'अंधश्रध्दा निर्मूलन' हेही एक प्रमुख उद्दिष्ट आहे. ही अंधश्रध्दा नुसतीच अडाणीपणातून आलेली नाही हे मला प्रकर्षाने जाणवले. अशिक्षित माणसांएवढीच सुशिक्षित माणसांमध्येही अंधश्रध्दा तेवढयाच खोलवर रुजलेली आहे. असं मला चळवळींतून काम करताना जाणवले. त्यातही सुशिक्षित माणसे जेव्हा अंधश्रध्देला विज्ञानाचा आधार (?) देऊन समर्थन करु लागतात; तेव्हा समाजातला हा वर्ग जास्त धोकादायक वाटू लागतो.

माणसं अनुकरणप्रिय असतात. समाजातील पुढारी,नेते आणि समाजाला दिशा दाखवणारी शास्त्रज्ञ मंडळी जेव्हा अंधश्रध्दा जोपासू लागतात, तेव्हा त्यांचेच अनुकरण इतर सामान्य माणसेही करतात. आणि समाज दैवाच्या भोवऱ्यात गटांगळया खाऊ लागतो. पुढाऱ्यांचे एक वेळ समजू शकतो. कारण त्यांना राजकारण करावयाचे असते. (खरं तर अशा प्रकारचे राजकारण निषिध्दच आहे.) पण, विज्ञानाची कास धरून प्रगतिशील विचार मांडणाऱ्या विचारवंत शास्त्रज्ञांना मात्र अशी समाजविघातक कृत्ये करताना विरोध केला पाहिजे. त्यासाठी सामान्य माणसांना तयार करणे आवश्यक आहे. हा हेतू लक्षात घेऊन मी चळवळीतून कार्य करावयास लागलो.

अर्थात समाजाला तुम्ही अंधश्रध्दाळू आहात, तुम्हाला काहीच कळत नाही, मांत्रिक-भगत मूर्ख आहेत; दैवी शक्ती, चमत्कार सर्व काही झूठ आहे; साप

चावल्यावर मांत्रिकाकडे न जाता, भैरोबाच्या देवळात न जाता डॉक्टरकडे जा; अशी नुसती भाषणबाजी करून हे काम होणार नाही हे ही मला जाणवलं. कोणता माणूस स्वत: मूर्ख आहे हे कबूल करील ? त्यालाही काही वैचारिकता असेलच, भले तो विचार चुकीचा ( तुमच्यामते ) असेना. म्हणून काही तुम्ही त्याला मूर्ख ठरवू शकत नाही. अशावेळी त्याचा विश्वास संपादन करूनच त्याच्याशी गोड बोलून,मवाळ शब्दांत त्याच्या चुका समजावून सांगून चमत्कारामागील वैज्ञानिक कारणे त्याला स्पष्ट सांगावयास हवी. हा व्यवहार प्रयोगनिष्ठतापूर्वक व्हावयास हवा. नाहीतर उंटावरुन शेळ्या हाकल्यासारखे होईल.

साप चावल्यावर डॉक्टरांकडे जा; म्हणणे सोपे आहे.पण, ज्या गावात आठ-आठ दिवस डॉक्टर येत नाही आणि डॉक्टराकडे जाण्यासाठी दोन दोन तास पायपीट करावी लागते; तेवढयात साप चावलेला रोगी मरून जायचा. मग अशा वेळी खेडूत भैरोबाच्या देवळात किंवा मांत्रिकाकडे गेला तर दोष कुणाचा ? त्याचा की समाजाचा ? जो समाज त्यांच्या साध्या गरजाही पुरवू शकत नाही, अशी समाजव्यवस्था बदलल्याशिवाय ह्या अंधश्रध्दा दूर होतील का ? देवी, प्लेग हे रोग सध्या नाहीसे झालेले दिसतात. ह्याचे कारण प्रत्येक जन्मणाऱ्या मुलाला देवीची लस टोचून घेण्याचा आग्रह व वैद्यकीय सुविधा की ज्या अगदी खेड्यापर्यंत पोहोचण्याचे शर्थीचे प्रयत्न केले आहेत. मरीआई वा सटवाईच्या कोपामुळे देवी येते; हा समज आता जवळजवळ जनमानसातून उखडला गेला आहे. म्हणजे, अंधश्रध्दाचे उच्चाटन करण्यासाठी दुसरी प्रभावी व फायदेशीर व्यवस्था उभी राहिल्यास, लोक ती स्वीकारतात हेच यावरून सिध्द होत नाही काय ?

अशाप्रकारे आपल्याला बाहेरची बाधा, अंगात येणे, भानामती या भ्रामक समजुतीची मुळे समाजव्यवस्थेतच सापडतात. हे प्रकार ९५ % स्त्रियांमध्येच आविष्कृत होताना आपल्याला दिसतात. याची कारणे, समाजामध्ये त्यांना मिळणारी वागणूक, त्यांना एक उपभोग्य वस्तू म्हणून मिळणारी किंमत, त्यांनाही मन असते, विचार करता येतो, एक व्यक्ती म्हणून जगण्याची इच्छा असते, असे विचार न करण्याची समाजाची प्रवृत्ती ही आहेत; याचा आपण कधीतरी विचार करणार आहोत काय ? मुलींना शिक्षाणापासून वंचित ठेवणे, त्यांना घरात डांबून ठेवणे, त्यांच्या इच्छा-आकांक्षांची होळी करणे, अशा कृतीतून स्त्रियांमध्ये एकलेपणाची, अस्वस्थेची जाणीव निर्माण होते. त्या कुढायला लागतात. मग या छळवादातून कंटाळून एक तर त्या आत्महत्या तरी करतात किंवा वरीलपैकी एखाद्या भ्रामक समजुतीची शिकार होतात.



त्यानिमित्ताने तरी लोक आपल्याकडे लक्ष पुरवतील, आपल्याला सहानुभूती देखील असे त्यांना वाटायला लागते.

खरं तर भूतबाधा, अंगात येणे, भानामती हया सगळया मनोविकृतीच असतात. त्यावरील खात्रीदायक उपाय मंत्रतंत्र, बुवा-भगत, देवर्षी नसून मानसोपचार हाच असतो. पण, शहरातच जिथे मानसोपचार तज्ञांकडे जाणे कमीपणाचे मानले जाते; तिथे खेडेगावांची काय कथा ? दुसरे असे की मानसोपचार हा अजूनही महागडा उपचार आहे. खेडेगावात जिथे एक वेळ खायची भ्रांत असते, तिथे हा महागडा उपचार करणे त्यांच्या आवाक्याबाहेरचे असते. आणि तिसरे म्हणजे मानसोपचारावर अजूनही लोकांचा न बसलेला विश्वास. तसेच भुतांचे खेळ, भानामती हया प्रकारांमागे माणसाचा हात असतो. हे पटलं तरी, जोपर्यंत समाजातील मूळ व्यवस्थाच बदलतत नाही, लोकांमध्ये वैज्ञानिक दृष्टिकोनाची वाढ होत नाही;तोपर्यंत हया भ्रामक समजूती नाहीशा होणे कठीण आहे. त्यामुळे मुळावरच घाव घातला पाहिजे. फांद्यांवर प्रहार करून काहीही निष्पन्न होणार नाही. ती वरवरची मलमपट्टी ठरेल. हेही चळवळीतून काम करताना जाणवले. मूठ मारणे, करणी करणे, शकून-अपशकून हया सर्व कल्पना आजच्या समाज व्यवस्थेचा परिणाम आहे.

सुरुवात म्हणून असंही करता येईल की, खेडयात जेथे डॉक्टर जाऊ शकत नाहीत तेथील वैदू व भगत यांनाच वैद्यकीय प्राथमिक शिक्षण देऊन तयार करणे.नाहीतरी भगत, देवर्षी मंडळी मानसिक धक्कयाचा आधार घेऊनच बाहेरची बाधा आलेल्यांवर अघोरी उपाय करीत असतात. वैदू जडीबुटींची औषधे देत असतात. ते या शिक्षणामुळे वैज्ञानिक दृष्टी घेऊनच काम करु लागतील. दुसरे असे की, हे लोक तिथेच रहाणारे, गावकऱ्यांत मिसळणारे,त्यांचीच भाषा बोलणारे असल्यामुळे, गावकऱ्यांना ते आपलेच वाटतात. त्यांच्याशी सुसंवाद लवकर साधू शकतो. मग हेच वैदू वा भगत कठीण समस्यांचे असलेले रोगी डॉक्टरांकडे पाठवू शकतील; आणि शहरं व खेडी यांच्यात आरोग्यविषयक एक उत्तम साखळी तयार होऊ शकेल. परिणामी समाजातील अंधश्रध्दा कमी होण्यास मदत होईल. वैदू,भगत, मांत्रिक यांच्यावर अविश्वास टाकून जे साधणार नाही,ते या व्यवस्थेमुळे साधले जाईल. शासनाने जर या बाबतीत पुढाकार घेतला नाही, तर विविध विज्ञान चळवळींनी पुढाकार घेऊन असे कार्यक्रम राबवले पाहिजेत. . सुरुवात तळागाळातूनच व्हायला हवी. मग दांभिक प्रतिष्ठेचा डोलारा पडायला काय अवकाश ? त्यासाठी जबरदस्त पर्याय निर्माण करणे हेच चळवळींचे प्रमुख उद्दिष्ट असायला हवे. असो !

मी या पुस्तकामध्ये,चळवळीत काम करीत असताना ज्या गोष्टी,ज्या घटना ऐकल्या, पाहिल्या त्या कथांच्या रूपात मांडल्या आहेत. या कथा लिहिताना जाता-जाता भ्रामक समजुतींमागील वैज्ञानिक सत्याचा उहापोह देखील केला आहे. पण एकंदरीत कथेचा बाज सांभाळण्याचा प्रयत्न केला आहे. ही तारेवरची कसरत करत असताना मी आणखी एक गोष्ट केली आहे. ती म्हणजे, कथेतील घटना जरी सत्य असल्या, तरी घटनेची स्थाने व पात्रे मात्र पूर्णपणे काल्पनिक आहेत.

अशा या कथा व त्यातील विचार कितपत परिपोषक ठरत आहेत. या विषयीचा अधिकार, मी आपल्यासारख्या सुजाण वाचकांवरच सोपवीत आहे.

**जगदीश काबरे,**
**वाशी, नवी मुंबई.**
**डिसेंबर १९९०**



# चमत्कार बाबांचे, रहस्य विज्ञानाचे.

मुंबई शहरातील धारावीची झोपडपट्टी. जिचा आशिया खंडातील सर्वात मोठी झोपडपट्टी असा लौकिक आहे; याठिकाणी एका बाजूला स्मगलिंगपासून वेश्या व्यवसायापर्यंत, तर दुसऱ्या बाजूला धर्माच्या नावाखाली देवळे उभारण्यापासून ते बाबा-महाराजापर्यंत अनेक गोष्टी गुण्यागोविंदाने नांदत आहेत.

या सर्व घटना पाहून विश्वासने तिथे एक मंडळ स्थापन केलंय. त्या मंडळाचं नाव आहे, 'अंधश्रद्धा निर्मूलन मंडळ" हा चांगला सायन्सचा पदवीधर आहे. येथील बुवा-महाराजांच्या अनेक घटना पाहून, त्यात शोषले जाणारे त्याचे बांधव पाहून त्याला काहीतरी करावंस वाटलं. अन् म्हणूनच चार-पाच समविचारी मित्रांना एकत्र करून हे मंडळ स्थापन झालंय.

मंडळ स्थापन झालं खरं. पण त्याच कार्य खरोखर कठीण होतं. मुळात अंधश्रद्धाळू माणसांना तुम्ही करता ते चूक आहे; हे सांगणंच धाडसाचं होतं. कारण त्यांना एक तर असं वाटायचं की, हे कालचं पोर आपल्याला काय 'श्यानपना' शिकवणार आणि दुसरं असं की, ते जे करत आहेत ते देवाचं आहे, धर्माचं आहे अशी त्यांची ठाम समजूत होती. त्यांना ही अंधश्रद्धा आहे. हे समाजविघातक आहे असं मुळी वाटतच नव्हतं.

पण तरीही विश्वासने त्यांच्या कामाची दिशा आखली. जिद्दीनं काम करायला सुरुवात केली. सुरुवातीला नाक्या-नाक्यावर गप्पाटप्पा करत वेळ वाया घालवणाऱ्या मुलांना हाताशी धरून, त्यांच्यात ह्या विषयावर चर्चा करायला सुरुवात केली. काही तरुणांना तात्काळ पटलं. काहींना पटलं. पण त्यासाठी काही हालचाली करावी असं वाटलं नाही. तर काहींना हे कितीही समजून सांगितलं तरीही पटलं नाही. काय करणार ! लहानपणापासूनचे संस्कार असे चर्चेतून थोडेच नाहीसे होणार ! पुन्हा मनातील भीती, पटलं तरी, 'न जाणो तसं असलं तर काय घ्या. !' यामुळेही काही तरुण मागे हटले. पण एकंदरीत सुरुवात तर उत्साहवर्धक झाली खरी.

चर्चेच्या ओघात श्रद्धा म्हणजे काय ? अंधश्रद्धा म्हणजे काय ? भूत आहे की नाही ? भानामती भयंकर कशी असते ? शकून-अपशकून या गोष्टींचा

परिणाम कसा होतो? अंगात देव किंवा देवी येतात म्हणजे काय होतं? चमत्कारामुळे आयुष्यात बदल कसे घडतात? सिध्दी, दैवीशक्ती आहे काय? चमत्कारांच्या सहाय्याने असाध्य रोग बरे करता येतात काय? आणि मुख्य म्हणजे देव आहे काय? धर्म म्हणजे नेमके काय? असे अगणित प्रश्न विचारले जात. त्यांचा उहापोह होई. ह्या सर्व चर्चांमध्ये मंडळाचे कार्यकर्ते कधीही तरुणांना तुच्छ लेखत नसत. त्यांचे प्रश्न आपुलकीने, आस्थेने ऐकून घेत. ह्यामुळे झाले काय की, बऱ्याच तरुणांचा मंडळातील कार्यकर्त्यांवर विश्वास बसला. आणि बोल-बोल म्हणता मंडळाच्या सभासदांची संख्या वाढू लागली.

तरुणांना येथे आपल्याला काहीतरी करायला वाव आहे असं वाटू लागलं. या तरुणांना आणखी विश्वासात घेण्यासाठी, त्यांच्या परिसरातील बुवा-बाबा लोक जे काही चमत्कार करून दाखवीत तेही करून दाखवायचे असंही मंडळाने ठरविलं.

आणि एके दिवशी त्यांच्या मंडळात ही सर्व मंडळी जमली असताना विश्वासने, भगवीकफनी घातलेल्या बाबाचा वेष घेवून 'अलख निरंजन'! अशी आरोळी ठोकली.

"अजाण बालकांनो, तुम्ही सगळे कोणत्या न् कोणत्यातरी चिंतेत आहात. तुमच्या चिंता हरण करण्यासाठी अन् तुम्हाला सुखी जीवनाचा लाभ देण्यासाठी मी येथे आलो आहे. कालच मला दत्तमहाराजांनी दृष्टांत दिला. अन् सांगितलं, बेटा जा, धारावी नामक भल्यामोठ्या वस्तीत तुझी गरज आहे. तेथे अश्विन, राकेश, महेश नावाचे होतकरू तरुण तुला भेटतील व तुझी कृपा ग्रहण करून, जगाच्या उद्धारासाठी तुझे शिष्यत्व पत्करतील."

आपली नावे अचूक घेतल्याबरोबर त्या तिघांनाही भारून गेल्यासारखे वाटले. हा कोण बाबा? ज्याला जन्मात कधी पाहिलं नाही. तो आपली नावं जाणतो. दत्तमहाराजांची कृपा झाली असे वाटून ते तिघेही उठले. त्यांनी बाबांचे पाय धरून साष्टांग नमस्कार घातला.

"बाबा, आमच्यावर कृपा करा." म्हणत त्यांनी वर पाहिले तो काय! बाबांची समाधी लागलेली! त्यांचे दोन्ही हात हवेत फिरू लागले.

"बालकांनो कल्याण मस्तु:" असं म्हणत त्यांनी रिकाम्या हातातून आशीर्वाद म्हणून विभूती काढून त्यांच्या हातावर ठेवली. इतर सर्व मंडळी हे पाहतच होती. त्यातच बाबा आल्याची वार्ता आजूबाजूला पसरत होती. त्यामुळे बघ्यांची गर्दीही वाढत होती. बाबांचे एकदोन शिष्य वातावरणनिर्मिती करत होते.

रिकाम्या हातातून विभूती काढलेली पहाताच सर्व मंडळी त्यांच्या पायावर



लोटांगण घालण्यास पुढे सरसावली अन् विभूतीचा प्रसाद घेण्यासाठी धडपडू लागली.

तेवढ्यात एका भक्ताने बाबांच्या पायावर नारळ ठेवला. बाबांनी तो नारळ उचलला. त्यावर हळद कुंकू वाहिलं. मंत्र पुटपुटत त्याला इकडे तिकडे हातवारे करीत फिरवला व खाली ठेवला. दरम्यान लोक बाबांच्या पाया पडतच होते. नारळ, लिंबू वाहत होते. बाबांनी नारळ पुन्हा उचलला अन् खड्या आवाजात आरोळी ठोकली. 'अलख निरंजन!'

सगळी मंडळी एकदम शांत झाली. बाबाने मंत्र पुटपुटून त्या नारळावर फुलाने पाणी शिंपडले. पाहता पाहता नारळाच्या शेंडीतून धूर येऊ लागला. थोडयाच वेळात शेंडी जळू लागली. बाबांनी मंत्र सामर्थ्याने अग्नी पेटवला. हे पाहताच बाबांना साक्षात अग्निदेवता प्रसन्न आहे. हे तेथील सर्व लोकांना पटलं. बाबांचा भाव आणखी वधारला.

मंडळातल्या काही तरुणांना वाटायला लागलं, आज नेमका विश्वास कुठे गायब झालाय? तो पाहिजे होता इथे. म्हणजे त्याला कळलं असतं सिद्ध पुरुष काय करू शकतात ते. मारे लंब्या चौड्या गप्पा मारत होता. अंतर्ज्ञानाने हा बाबा आमच्या मित्रांची नावं ओळखतो. विभूती काढून दाखवतो. एवढंच नाही तर मंत्राग्नीही पेटवतो. त्याला त्यासाठी काडेपेटीचीही गरज लागत नाही.

त्याची अशी कुजबूज चाललीय तोच त्यांना समोर वेगळं दृश्य दिसायला लागलं.

विश्वासनं मंडळी कह्यात आलेली पाहून त्यांच्या शिष्य बनलेल्या मित्रांना त्याने डोळ्यानेच जवळ बोलावलं. व आपलं खरं स्वरूप प्रकट करण्याची वेळ आल्याच सांगितलं. नंतर तिघेही आपल्या अंगावरची कफनी काढून लोकांसमोर उभे राहिले.

'अरे,. हा तर विश्वास...बाबा...विश्वास! मंडळातील मुले ओरडली. विश्वासने आणि त्याच्या शिष्य बनलेल्या मित्रांनी सर्वांना शांत राहण्याची हात वर करून खूण केली.

भांबावलेल्या स्थितीतून बाहेर पडायला काही वेळ लागलाच. तेवढ्या वेळात विश्वासने एका टेबलावर प्रयोगाचं साहित्य मांडून घेतलं.

मंडळी शांत झालेली पाहून तो धीरगंभीरपणे बोलू लागला, "मित्रांनो, मी हे सर्व नाटक आपल्या भावना दुखवण्यासाठी नाही केलं तर आपण सर्वच अज्ञानाची शिकार कसे बनतो; हे या प्रात्यक्षिकातून मला दाखवून द्यायचं होतं. एवढे दिवस आपण सतत चर्चा करत होतो. विज्ञाननिष्ठ दृष्टिकोन म्हणजे

काय ? हे पटवून घेण्याचा आपण प्रयत्न करत होतो. आता आपल्या कार्याच्या पुढच्या टप्प्याला सुरुवात करण्यापूर्वी आपण नवीन विचार कितपत स्वीकारलेयत हे आजमावण्यासाठी मी हे नाटक केलं."

"माणसं सुशिक्षित असोत वा अशिक्षित, आपण सर्वजण आपलं जीवन नशिबाच्या हवाली करत असतो. आपले हे भोग आपण जन्माबरोबरच आणतो. अशी आपली दृढ धारणा असते. कुणाच्या तरी कृपाप्रसादानेच आपले नशीब उजळणार असं आपल्याला वाटत असतं. बाबालोकही अशा विचारांना खतपाणी घालून ते समाजात घट्ट रुजवण्याचं कार्य करत असतात. कारण त्यावरच त्यांची पोळी पिकत असते. मग ते क्षेत्र हेरतात. तेथील बित्तंबातमी काढतात. आणि अचानक प्रगटल्यासारखे तेथे उगवतात.

"मी जशी महेश, राकेशची नावं दृष्टांताचा आधार घेऊन सांगितली, तसे तेही करतात. त्यांच्या या अंतर्ज्ञानाने आपण भारावून जातो. एकदा का तुमच्या मनात त्यांची जागा तयार झाली की मग काम सोपं असतं. हां हां म्हणता बाबांच बस्तान बसतं. सांगोवांगीच्या चमत्काराच्या कथा पंचक्रोशीत पसरतात बाब चैन करत असतो. भक्त बिचारा आपण नागवले जात आहोत हे लक्षात न घेता त्यांच्या सेवेत चूर असतो. कारण त्याला तो बाबा त्याच्या विवंचनांतून मुक्त करणार असतो असे वाटत असते. "आपले प्रश्न तरी काय असतात ? कुणाला नोकरी मिळत नसते. तर कुणाला बायको ! कुणाला मूल हवं असतं तर कुणाला मुलाचं तथाकथित असाध्य आजारपण घालवायचं असतं. कुणाच्या मुलीचं लग्न जुळत नसतं कुणाचा मुलगा मुका असतो... बहिरा असतो. खरं पाहता हे प्रश्न प्रयत्नांनी सुटणारे असतात. पण आपणाला हवा असतो सुखाचा शॉर्टकट. मग आपण कुण्या एका बुवा—बाबाच्या भजनी लागतो. योग्य उपचार न करता, आपल्या चुकीमुळे तथाकथित धर्माच्या, देवाच्या पगड्यामुळे आपण अघोरी उपाय करतो. पण, गंमत अशी की या प्रकारात आपण फसवले जातोय हे आपल्या लक्षातच येत नाही. यालाच मी अंधश्रद्धा म्हणतो."

"तुमचा विश्वास बसण्यासाठी आणि त्याला स्वत:ला सिद्ध पुरुष आहे हे तुमच्यावर छाप पाडून बिंबवण्यासाठी, तो बाबा मग काही चमत्कार करून दाखवतो. खरं तर हे चमत्कार नसतात. तो करतो ती असते निव्वळ हात चलाखी वा विज्ञानाचे प्रयोग. म्हणजे हा विज्ञानाचा दुरुपयोगच झाला की ! पण म्हणतात ना लकडी शिवाय मकडी वळत नाही अन् चमत्काराशिवाय नमस्कार मिळत नाहीत."

"मी जे दोन चमत्कार करून दाखवले ते चमत्कार नव्हतेच मुळी ! ते होते जादूचे प्रयोग."



"विज्ञान असं सांगतं की, या विश्वात कोणतीही वस्तू निर्माण करता येत नाही, अथवा नाहीशीही करता येत नाही. त्या वस्तूचं फक्त रूपांतर होतं; म्हणजे एका प्रकारच्या वस्तूंचं दुसऱ्या प्रकारच्या वस्तूत. पण मूलतः ते सर्व मूलभूत कण तेच असतात. मग मी तुम्हाला रिकाम्या हातातून, हवेतून विभूती काढून देणं शक्य तरी आहे काय ? तरीही मी तुम्हाला विभूती दिली. म्हणजे मी हातचलाखी केली. ही विभूती काढण्याचे अनेक प्रकार आहेत."

"मी माझ्या पहिल्या बोटाच्या व अंगठ्याच्या बेचक्यात सफाईदारपणे विभूतीचे खडे लपवून ठेवले होते. दाखवताना जरी ते रिकामे हात असले, तरी त्यात खडे अशा खुबीने पेरले होते की, तुम्हाला ते दिसणार नाहीत. मग हात हवेत फिरवल्यासारखे करून, तुम्हाला आशीर्वाद दिल्यासारखे करून ते खडे मुठीत आणले व चुरून तुमच्या हातावर विभूती टेकवली."

"काही बाब लोक पाच पाचशे माणसांना त्यांच्यात फिरून सतत रिकाम्या हातातून विभूती देण्याचं पुण्यकर्म करत असतात. हे लोक नेहमी लांब हाताचे झगे घालतात तेही भगव्या रंगाचे. ह्या झग्यातील काही जागा म्हणजे विभूतीच्या खड्यांची गोदामे असतात. म्हणजे असे की लांब हाताच्या बाहीच्या कडांची आतील बाजू, झग्याच्या खालच्या कडांची आतील बाजू इ. ह्या भागातून ते बोट घालून सफाईदारपणे विभूतीचे खडे मुठीत घेवून, अनेकांना विभूतीचा प्रसाद देऊ शकतात."

"एवढंच नव्हे तर काही लोक ह्यात हातचलाखीचा वापर करून शिवलिंग, सोन्याची अंगठी, गणपतीची मूर्ती, हिऱ्यांचा हार अशा अनेक वस्तू हवेतून काढून देतात. ह्यांचा हा प्रसादही अर्थातच भक्ताच्या सामाजिक प्रतिष्ठेप्रमाणे असतो. म्हणजे असं की, सामान्य माणसाला फक्त विभूतीचा, तर मंत्र्याला हिऱ्याची अंगठी दिली जाते. थोडक्यात काय, जसा भक्त तशी कृपा."

"आता मंत्राग्नी कसा केलास तेही सांग ना विश्वास." एवढा वेळ उत्सुकता दाबून धरलेला राकेश म्हणाला.

"मी आता तिकडेच वळणार होतो." असं सांगत विश्वासने सुरुवात केली. "मंत्राग्नी हा तर खरं पाहता नववी/दहावीच्या विज्ञानातील प्रयोग आहे. हा प्रयोग कुणीही शेंबडा पोर सुद्धा करू शकतो. फक्त त्याला माहिती पाहिजेत त्यासाठी लागणारी रसायनं."

"नारळाची शेंडी असते. लाकडाच्या भुशासारखी. थोड्याश्या उष्णतेनंही पेट घेणारी. त्यात बुक्का म्हणून पोटॅशियम परमँगनेटची पूड भरायची. त्यावर तुपाची धार म्हणून ग्लिसरीन ओतायचं. झालं ! ग्लिसरीनची पोटॅशियम परमँगनेटवर होणारी अभिक्रिया म्हणजे उष्णता निर्माण करणारी असते. ती

उष्णता शेंडीला पेट घेण्यासाठी पुरेशी ठरते. हाहा म्हणता धुरानंतर निळसर ज्योतीने नारळाची शेंडी पेट घेते. ही निळी ज्योत त्या पोटॅशियम परमँगनेटच्या संयुगातील पोटॅशियम धातुकणांच्या जळण्यामुळे निर्माण झालेली असते. हा गुणधर्म नववीत शिकवला जातो. नारळाला नव्हे श्रीफळाला आपल्या कर्मकांडात एक वेगळं पावित्र्य चिकटवलेलं असतं. त्यामुळे नारळाच्या शेंडीतून मंत्राच्या सहाय्यानं अग्नी पेटला हे बघून त्याला वेगळंच महत्त्व प्राप्त होतं आणि बाबाच्या सिद्धीचा डंका चहूकडे पसरला जातो.

"पण तू तर त्या बाहेरच्या माणसाने दिलेल्या नारळातून अग्नी काढून दाखवलास. त्यात कुठे ही रसायनं होती ?" महेशची ती रास्त शंका आली.

"अरे, त्यात काय ! सोपं आहे. भक्ताच्या नारळावर मंत्र पुटपुटल्यासारखे करून त्याला हाताने इकडे तिकडे फिरवायचा अन् तुपात खरे तर ग्लिसरीनमध्ये फूल बुडविण्यासाठी नारळ खाली ठेवायचा. फूल तुपातून बुचकळून काढल्यानंतर चलाखीने आपला सिद्ध केलेला नारळ हातात घ्यायचा. भक्ताला मात्र वाटतं त्याचाच नारळ उचलला. म्हणजे पुन्हा इथेही हातचलाखीचं कौशल्य आलंच. पुढे काम सोपंच असतं."

"तर मित्रांनो, आज मला वाटतं, आपण आपल्या कार्याचा पहिला टप्पा पूर्ण केलाय. म्हणजे असं की, सुरुवातीला आपण जे काय करणार आहोत त्यामागची भूमिका प्रत्येक कार्यकर्त्याला समजून घेणं आवश्यक असतं. आत्तापर्यंत आपण फक्त चर्चाच केल्यात. विचारांची बैठक पक्की करण्यासाठी त्या आवश्यक असतातच. नव्हे, त्या घडल्याशिवाय पुढचं पाऊल टाकणं म्हणजे आततायीपणा करणं. म्हणून संवाद साधल्यानंतरच कामाला खरी गती येत असते. तेव्हा आता आपलं काम व्यापक स्वरूपात होण्यासाठी आपण हालचाल करायला हवी."

"विश्वास, मला असं वाटतं की सरळ ह्या भोंदू लोकांवर हल्लाच करावा" राकेश म्हणाला.

"तसं नको. आपण मोर्चा काढू या." महेश.

"हे बघा, असं काही करून आपण वातावरणात तणाव निर्माण केला तर नंतरची परिस्थिती आपल्याविरुद्ध जाईल. आधीच लोकांना आपल्या बाजूनं वळवणं कठीण. त्यात अशी हुल्लडबाजी केली तर परिस्थितीचा समाज कंटक फायदा घेतील. आणि आपलं उखळ पांढरं होईल. त्यात पुन्हा सामान्य माणूस भरडला जाईल तो वेगळाच. उलट अंधश्रद्धेचा जम बसवण्यासाठी मदतच होईल. कारण अंधश्रद्धा पोसणारे गप्प बसणार थोडेच. बरं सामान्य माणूस अंधश्रद्धा असल्यामुळे ते त्यांचीच बाजू घेणार आणि आपल्यालाच मंडळ बंद



करावं लागेल." विश्वास समजुतीच्या वाणीने म्हणाला.

"मग कसं करायचं ?" अश्विन चिंताग्रस्त चेहरा करून म्हणाला.

"काम तर करायचंच आहे आणि तेही यशस्वीपणे." विश्वास सांगू लागला," लोकांना विश्वासात घेऊनच हे काम होईल. त्यांना तुच्छ लेखून, कमीपणा देऊन वा अडाणी समजून, 'आम्ही तुम्हाला ज्ञानामृत पाजायला आलो आहोत.' अशा आवेशाने काम करून चालणार नाही. टप्प्याटप्प्याने त्यांच्या वागण्या-विचारातील विसंगती दाखवून, त्यांनाच प्रश्न विचारून अंतर्मुख करावे लागेल. आपल्याला काम धीमेपणानं आणि शांतपणानं, भावनेच्या आहारी न जाता करावं लागेल. आपण असं करूया. सध्या उन्हाळ्याचे दिवस आहेत. शाळा-कॉलेजे नाहीत. सुट्ट्या पडल्यायत. तेव्हा शाळेच्या पटांगणात कथामालेचं आयोजन करू या. कथांमधून दररोज एकेका विषयाचं निरुपण करू आणि शेवटच्या दिवशी चमत्कारांचा कार्यक्रम ठेवू. पाहू या काय घडतं ते. निदान ह्यातून तरी लोक विचार करायला शिकले तरी आपण बरंच काही कमावलं असं म्हणता येईल."

# सवतीनं झपाटलं

आज कथामालेची सुरूवात होणार आहे. शालेचं भव्य पटांगण स्वच्छ केलेलं आहे. बरोबर समोर स्टेजची उभारणी केलीय. मागे 'अंधश्रद्धा निर्मूलन मंडळ' असा पडदा लावला आहे. ध्वनि - क्षेपकाची योजना कार्यन्वित करण्यात काहीजण गुंतलेयत.

हे सारं दृश्य विश्वासला विलोभनीय वाटत होतं. गेल्या महिन्याभरात तरुण मंडळीची मनं तयार करण्यात आणि त्यांना कामाला लावण्यात त्याला बरंच यश आलेलं दिसत होतं. गेल्या आठवड्यात कथामालेचं ठरवल्यापासून, तर कामाची एकच धांदल उडाली होती. पोस्टर्स लिहिणं, रंगवणं, छापून आणणं, त्यांचं वाटप करणं, शाळेच्या हेडमास्तरांना भेटून त्यांचं सहकार्य मिळवणं, एक ना अनेक कामांची झुंबड उडाली होती. त्यात परत विश्वासलाच ह्या सर्व कथा सांगायच्या असल्यामुळे त्यांची पूर्ण तयारी करणं; हेही एक जबाबदारीचं काम होतंच.

खरं तर आज विश्वासला थोडं टेंशनच आलं होतं. आपण ही जबाबदारी व्यवस्थित पार पाडू शकू ना, असं त्याला राहून-राहून वाटतं होतं. पण त्यानं तयारीही जबरदस्त केली होती. त्यामुळे त्याचा आत्मविश्वास ठाम होता. त्यानं जी विचारांची मांडणी केली ती कथांच्या सहाय्याने गुंफायची - थोडक्यात एक प्रकारचं कथाकथनच म्हणा ना! आणि परिणाम साधण्यासाठी शेवटी एखाददुसऱ्या चमत्काराचा प्रयोग. मांडणी तर पक्की झाली होती.

माणसंही आता जमू लागली होती. ह्या पोरांनी हे काय नवीनच खूळ काढलंय ते पाहण्यासाठी आजची गर्दी होती. असं त्यांच्या कुजबुजीवरून जाणवत होतं. विश्वासला वाटलं आज जर आपण बाजी मारली तर पुढचं सारं सुरळीत पार पडेल. आजचा दिवस खरा महत्त्वाचा आहे.

ठीक नऊ वाजता कथामालेची सुरुवात करण्यात आली. विश्वास बोलायला उठला.

गुलबर्गा जिल्ह्यातील मुत्तुहळ्ळी गांव. धड ना खेडं, ना शहर. मध्यमवस्तीचं. पण, आता तिथे कर्नाटक सरकारनं औद्योगिक क्षेत्र जाहीर केल्यापासून



गावाच्या परिसरात लहानमोठे कारखाने यायला लागले होते. अनेक नवीन इमारती वाढायला लागल्या होत्या. तर बऱ्याच इमारतींचं बांधकाम चालू होतं. अर्थातच बांधकामासाठी दूरदूरहून मजूर येत होते. गाव गजबजायला लागलं होतं.

अशाच एका इमारतीच्या बांधकामावर समण्णा व राधाक्का हे जोडपं काम करण्यासाठी आलं होतं. त्यांच्याबरोबर त्यांच्या गावची इतरही अनेक घरं येथे मजुरीसाठी येऊन राहिली होती.

दररोज बारा-बारा तास काम चालू असायचं. दुपारी जेमतेम जेवायला सुट्टी मिळायची. रात्रीच्या जेवणाला तर काही ठराविक वेळ नसायची. कंत्राटदार इमारत लवकर पूरी करण्याच्या मागे लागला होता. रात्रीच्या अंधारात गॅसबत्तीवर काम चालू असायचं.

त्यातच राधक्का पोटूशी राहिली होती. दिवस भरत आले होते. पण तरीही कामावर जाणं भाग होतं. दररोज रात्री मिळणाऱ्या मजुरीवरच त्यांचा भाकरतुकडा अवलंबून होता. कामावर न जाऊन चाललंच नसतं.

एवढं मरेस्तोवर काम केल्यानंतर भूक तर दामटून लागत होती. पण ह्या कामाच्या घिसाडघाईमुळे जेवणही वेळेवारी करता येत नव्हतं. तसं जेवण असं काय मोठं होतं? अशातला भाग नाही. साधी भाकरी, चटणी अन् कांदा. कधी कधी तर ढीगभर भातच वरणाबरोबर खायचा. अन् पाणी पिऊन पोट भरायचं.

रामण्णाला एवढं काम केल्यानंतर एक दोन नवटाक रिचवल्याखेरीज चैन पडत नसे. घरी आल्यावर जे मिळेल ते ओरपायचा. मग उरलं-सुरलं बिच्चारी पतिव्रता राधाक्का खायची. त्यामुळं पोट सदाचं उपाशी राहिलेलं.

गरोदरपणात सतत अर्धपोटी राहिल्यामुळे तिचा अशक्तपणा वाढत चालला होता. तिचे डोळे खोल जायला लागले होते. डोळ्याभोवती काळी वर्तुळे दिसायला लागली होती. हातापायाच्या काड्या झाल्या होत्या. पोट मात्र भराभर वाढत चाललं होतं. काळेपणातही तिचं शरीर पांढरफटक पडलेलं जाणवत होतं.

ही सर्व रक्तक्षयाची लक्षणं दिसत होती. शरीरातलं रक्त कमी होत चाललं होतं. अशा वेळी तिला गरज होती चौरस आहाराची. पालेभाज्या, अंडी, दुधाची पण, जिथे रोजच्याच जेवणाची मारामार, तिथे ह्या वस्तू तिला स्वप्नातही दिसणं शक्य नव्हतं.

एकदां काम करता करता तिला चक्कर आली. आजुबाजूच्या स्त्रियांनी तिला उठवलं अन् सावलीत नेलं.

दोन चार मिनिटं काम थांबलं. मुकादम वस्सकन ओरडतच आला. 'साल्या

काय बायका आहेत. कामं करायला नको. कामचोर रांडीच्या. संध्याकाळी पैसे मात्र भांडून घेतात. चला तिकडे कामाला.'

बायकांनी कलकलाट करून त्याला काय घडलं ते सांगितलं. त्यावर पुन्हा 'नाय झेपत तर कशाला कामाला येता. घरी बसा जावा नं.' असं म्हणतं, रामण्णाला हाक मारून राधाक्काला घरी न्यायला सांगितलं.

थोडसं पाणी प्यायल्यावर राधाक्काला जरा बरं वाटलं. अन् ती पुन्हा कामाला लागली. काय करणार खाडा करून चालण्यासरखं नव्हतं. दररोजचे तीन रुपये महत्त्वाचे होते. त्यावरच चूल पेटणार होती. रामण्णाचे पैसे तर दारूलाच पुरत नसत.

आणखी दोन चार दिवस गेले. काम करता करता त्या दिवशी राधाक्का बसली ती बसलीच. तिच्या पोटातून कळा यायला लागल्या होत्या. अन् काय होतंय हे कळण्यापूर्वीच तिनं तेथेच एका तान्ह्याला जन्म दिला.

धावाधाव झाली. बायाबापड्यांनी ताबडतोब फाटक्या मळक्या कपड्यांचा आडोसा केला. मूल व्यवस्थित बाहेर काढलं. मग तिला अन् त्या तान्ह्याला जवळच्याच तिच्या पालीकडे घेऊन गेल्या.

तिला धड डोळेही उघडवत नव्हते; एवढा अशक्तपणा आला होता. म्लान चेहऱ्यानं ती निपचित पडली होती. रामण्णा एकवार डोकावून, पुन्हा कामाला लागला होता. घरात राधाक्काच्या सोबतीला होती, ती ६ वर्षांची तिची सावत्र मुलगी पम्मी.

थोड्यावेळानं मूल किरट्या आवाजात किरकिरायला लागलं. तसं राधाक्कानं त्याला आपल्या छातीशी कवटाळलं. मूल बोंड चोखू लागलं. राधाक्काच्या चेहऱ्यावर तशाही परिस्थितीत समाधान झळकलं. थोड्यावेळानं मूल पुन्हा किरकिरायला लागलं तसं तिनं दुसरं बोंड त्याच्या तोंडात दिलं पण त्याची किरकिर थांबेना. खरंच होतं ते. स्तनात दूधच नाही, तर त्याचं पोट भरणार कसं ?

राधाक्का पुन्हा पुन्हा त्याला छातीशी लावत होती. मूल लुचत होतं. पण त्याचं किरकिरणं काही थांबत नव्हतं.

त्या दिवशी रात्री रामण्णा उशीराच घरी आला. तोपर्यंत शेजारणीनं राधक्काला पेज करून दिली होती. रामण्णा मात्र मूल झाल्याच्या खुशीत मित्रांना भरपूर दारू पाजून अन् स्वतःही पिऊन आला होता. राधाक्का अन् मूल झोपलेलं पाहून तोही एका कोपऱ्यात झोपून गेला.

दुसऱ्या दिवशी सकाळी रामण्णा म्हणाला, "चल उठ राधे. कामावर जायचं हाय.'



"आवो, मी उठूही शकत नाय. मला तापबी आलायसा वाटतूय. आज तुम्हीच जावा एकले."

"हे बघ, ताप घेऊन बसायला का तू राणी लागून गेलीयस. आपण गरिबांस्नी आजारी पडून चालत नाय. अग, ती बायजा बघ, बाळंतीन झाली. अन् लगेच दुसऱ्यादिवशी कामालाबी लागली. हे असले लाड चालायचे नाय. चल उठ."

"अवो खरंच मला उठना झालंय...."

"मग मर रांडे, मी चाललू. संध्याकाळचा भाकरतुकडा काय फुकटात मिळणार हाय व्हय."

असं बडबडत रामण्णा चालता झाला. सात वर्षापूर्वी त्याची पहिली बायको अशीच ओली बाळंतीण असतानाच मेली होती. त्यावेळीही तो असाच वागला होता. त्याला बायकोच्या आजारापेक्षा मिळणारी मजुरी महत्त्वाची वाटत होती. अन् दुसरं म्हणजे एक बायको मेली तर दुसरी करता येते. त्यामुळं त्याचीही खंत नव्हती.

परिस्थिती आणि सामाजिक रूढीच्या पगड्यामुळे माणूस कसा वागतो पहा !

दुपारपर्यंत राधाक्काचा ताप खूपच वाढला होता. तिचं सगळं अंग थडथड उडायला लागलं होतं. तापात असंबद्ध बडबडायला लागली होती. पम्मी घाबरली अन् तिला शांत करू लागली. खरं तर त्या बिचारीलाच काय करावं हेच कळेनासं झालं होतं.

तेवढ्यात शेजारची बायजा आली. पम्मीला थोडा धीर आला. पम्मी म्हणाली,"मावशे, बघ ग आई काय बडबडतेय."

बायजा राधाक्काची जुनी ओळख. ती दोन्ही कुटुंबे संसार घेऊन एकत्रच मजुरीसाठी फिरत असत.

राधाक्काच बडबडणं वाढलं होतं. तेवढ्यात तिच्या अशक्त कुडीत कोणतं बळ संचारलं देव जाणे. ती ताडकन् उठून बसली. अन् हातवारे करून बडबडू लागली. पम्मी तर ते पाहून रडूच लागली. बायजा तिला आवरायला गेली. पण राधाक्काच्या एका धक्क्याने बायजा कोलमडलीच. तिने हाका मारून दोनचार बायांना बोलावलं. आता त्या सर्वजणी मिळून तिला आवरायला लागल्या. कशीबशी तिला झोपवली. तिचं पोरगं कोपऱ्यात किरकिरत होतं तिकडं कुणाचंच लक्ष नव्हतं. झोपल्या अवस्थेतही ती जागेवरच थडथड उडत होती. असंबद्ध बडबड तर बरीच वाढली होती.

त्या बडबडीतंन बायजाला राधाक्का सवतीचं नाव घेऊन बडबडतेय असा

अर्थ लागला. त्या बरोबर ती म्हणाली, "राधाक्काला तिच्या सवतीनं धरलंय. ती हडळ तिच्या मानगुटीवर बसलीय."

हे ऐकताच सगळीकडं एकच बोंब पसरली. बाया--[illegible]ऱ्या, म्हाताऱ्याकोताऱ्या येऊन कायबाय बोलायला लागल्या. रामण्ण[illegible]ा कळलं, तेव्हा त्यानं तर कपाळावर हातच मारला. नसतं झेंगट मागे लागलं म्हणून चिंताग्रस्त झाला. बायजा रामण्णाला म्हणाली, "आता येळ घालवून उपेग नाय, लगीचच देवर्ष्याकडं जावा. तो यील अन् हे झाड सोडंल. नायतर राधाक्का काय तुमास्नी जिवंत मिळाची नाय."

रामण्णा देवर्ष्याला शोधायलाच निघाला. संध्याकाळपर्यंत तो एका देवर्ष्याला घेऊन आला. आल्या आल्याच देवर्ष्यानं 'जय बंभोले.' अशी जोरात डरकाळीच फोडली. ते ऐकून लहान पोरं आपापल्या आयांच्या पातळाआड दडली व किलकिल्या डोळ्यांनी त्याच्याकडं पाहू लागली. तर बाया आन् बापे मंडळी रामण्णाच्या झोपडीजवळ गर्दी करू लागली.

देवर्ष्यानं अंगावर भगवी कफनी अन पिवळी लुंगी घातली होती. त्याच्याबरोबर त्याचा एक शिष्यही त्याच वेषात आला होता. देवर्ष्याची दाढी व केसाच्या जटा मोकळ्या सोडलेल्या होत्या. एका हातात कवटी तर दुसऱ्या हातात दोन लांब हाडं. खांद्यावर झोळी-तीही भगवीच. डोळे उग्र.

रामण्णा त्याला झोपडीत नेतो. राधाक्का निपचित पडलेली असते. मघाशी आलेल्या झटक्याचा जोर ओसरलेला असतो. त्यावेळेस खर्च झालेली शक्ती, आता तिची गात्रं शिथिल करून टाकते. झोपडीच्या बाहेर ही गर्दी झालेली असते.

देवर्ष्याचा शिष्य त्याच्या गुरूच्या झोळीतून एकेक करीत वस्तू काढत असतो अन् त्यांची मांडामांड चालू असते. ह्या वस्तु आणण्यासाठी आणि हडळ उतरवण्यासाठी रामण्णाकडून शंभर रुपये आधिच उकळलेले असतात. रामण्णाने सावकाराकडून कर्ज घेऊन ते ताबडतोब त्याच्या हवाली केलेले असतात.

शिष्याची मांडणी पुरी झालेली असते. एका पाटावर मधोमध कवटी ठेवलेली असते. त्याखाली फुलीचा आकार देवून ती दोन लांब हाडं ठेवली जातात. एका बाजूला सुया टोचलेली लिंबे तर दुसऱ्या बाजूला एक ओबडधोबड काळी बाहुली. देवर्षी आता धूप जाळत असतो. सगळी झोपडी धूपाच्या वासानं अन् धुरानं भरून गेलेली असते.

आता तो मोठ्याने शंख वाजवतो. त्या एकदम मोठ्या झालेल्या आवाजामुळे राधाक्काचं मूल दचकून मोठमोठ्यानं रडायला लागतं. त्यासरशी



बायजा त्याला झटकन् उचलून आपल्या झोपडीत घेऊन जाते.

"चल उठऽ. हडळे, माझ्या समोर झोपताना लाज नाय वाटत ?" अशी जोरात डरकाळी फोडून तो राधाक्काचे केस धरून तिला उचलतो. "याद राख माझ्याशी गाठ आहे. ज्यादा चारसोबीसगिरी चालायची नाय."

केस ताणले गेल्यामुळे राधाक्का जिवाच्या आकांताने ओरडते. तो झटक्यात तिचे केस सोडतो. त्या बरोबर ती तोल जावून खाली कोसळते.

"बोल, तू झाडाला सोडतेस की नाय." पुन्हा एकदा त्याचा आवाज घुमतो. सगळी माणसं शांतपणे पहात असतात. मग तो हाड उचलतो. कवटी भोवती फिरवतो. तोंडाने मंत्र पुटपुटणं चालू असतं. चाकूनं कचकन एक लिंबू कापतो. अन् तिच्या अंगावर त्याचा रस शिंपडतो. राधाक्का कसलीच हालचाल करीत नसते.

"तू अशी ऐकायची नाय. तुला जबरदस्तच विलाज केला पायजेल." असं म्हणून तो शिष्याला झोळीतून लांब दाभणासारख्या सुया काढून देतो. व तापवायला सांगतो.

सुया तापवून होतायत तोवर हा तिला पुन्हा आवाज देतो. "सोड. सोड त्या झाडाला नायतर सुया खुपशीन बघ." असं म्हणत असतांनाच तिचे केस अन् साडीचा पदर एकदम झटक्यात खेचतो.

"आयाय ग. मेले. मेले रे देवा. वाचवा. मला कुणीतरी वाचवा." असा आक्रोश करत ती त्याच्या झटक्यामुळे उभी झालेली असते. तशाही परिस्थितीत तिच्या लक्षात येतं, साडी सुटलेली आहे. ती दोन्ही हात छातीवर घडी करून थरथरत उभी रहाते. डोळ्यात प्रचंड भेदरलेले भाव.

ते पाहून देवर्षी सांगतो, "बघा घाबरली नाय ही हडळ. माझ्यासमोर कोणतंबी जबरी भूत असू दे. त्याच्या गमज्या चालत नायत."

तेवढ्यात (शिष्य त्याच्या हातात सुया देतो.) मग हा त्या सुयांनी तिला टोचायला लागतो. तोंडाने आरडाओरडा चालूच असतो, "बोल जातेस की नाय."

सुयांच टोचणं सहन न होऊन ती ओरडायला लागते, "अरे चांडाळा, का छळतोस रे मला. आयायग नाही सहन होत. आवो, बघा की तुमच्या समोर मला उघडं केलं. सोडवा की यातून मला."

तिच हे बोलणं ऐकून याला आणखी चेव येतो. राक्षसी हास्यच करून तो आणखी जोरजोराने तिच्या सर्वांगाला अगदी गुप्तांगालाही सुया भोसकायला सुरुवात करतो. ती बेंबीच्या देठापासून ओरडत असते. बघ्या मंडळींना वाटतं ती हडळच ओरडतेय. तिच्या विनवणीकडे सारेच-अगदी रामण्णासुद्धा दुर्लक्ष

करतो.

"अरे दुष्टा, अरे चांडाळा, का छळतुयस रं. कुटं फेडशील हे पाप." असं म्हणून तिचं ओरडणं चालूच असतं.

"नाय, तू अशी नाय ऐकाय ब तुला मिरचीची धुरीच दिली पायजे." असं म्हणून तिला एक फाडक ात एवढ्या जोराने हाणतो की, तिच्या नाकातोंडातून रक्त येऊ लागतं. आणि ती बेशुद्ध पडते.

थोडावेळ तिची ह्या अत्याचारातून सुटका होते. हा मग पाणी मंत्रून तिच्या तोंडावर शिंपडतो. पाच-दहा मिनिटांनी ती शुद्धीवर येते अन् कण्हायला लागते. देवर्षीच्या पुन्हा अंगात येतं. ती जागी झालीय पाहून तो शिष्याला खुणावतो. शिष्य तिचे पाय बांधतो आणि तिला उलटी लटकवतो. ती अंगात असेल नसेल तेवढं बळ काढून हातपाय झाडायला लागते. गुरासारखी ओरडायला लागते. हा मात्र हा हा हु हु करत अंगात आल्याप्रमाणे डोलायला लागतो. हात झोळीत जातात. झोळीतून मिर्चीची पूड काढली जाते. आणि काय होतय ते कळण्याच्या आत तो तिच्या नाका तोंडात डोळ्यात आणि—आणि योनीतही ती पूड उडवून देतो.

आता मात्र ही एवढ्या जोराने ओरडते की झोपडीचं छप्पर फाटून जाईल की काय असं वाटायला लागतं. बस्स एवढाच तिचा आवाज शेवटचा आवाज ठरतो. ती जी कोसळते ती पुन्हा उठतच नाही. सर्वजण हा अत्याचार निमूटपणे पहात असतात. तिची हालचाल मंदावते. हा नाकाजवळ सूत नेऊन पहातो. त्याला जाणवतं की आज आपण काहीतरी ज्यादाच केलंय. तिचा श्वास मंद होत चाललेला असतो. आणखी थांबण्यापेक्षा इथून पोबारा केलेला बरा; असा सुज्ञ विचार करून तो सर्व आवरायला लागतो.

त्याचवेळेला तो रामण्णाला सांगत असतो, "आता हे झाड मोकळं झालंय. म्हणूनच ती शांत पडलीय. झोपलीय. सकाळी सगळं व्यवस्थित होऊन जाईल आणि गेले तीन तास चाललेला हा खेळ बंद करून, काही जडीबुटी देऊन तो व त्याचा शिष्य काढता पाय घेतात.

रामण्णा 'सुटलो एकदाचा' असा भाव चेहऱ्यावर आणून बाहेर जातो. हळूहळू गर्दीही पांगू लागते. राधाक्काचं मूल तिकडे भुकेने व्याकुळ होऊन दुधासाठी टाहो फोडत असतं. बायजा कसं तरी त्याला गप्प बसवते.

अशीच रात्र जाते.

सकाळी बायजा मुलाला घेवून राधाक्काजवळ जाते. तिला मऊपणे उठवायला जाते, तो काय तिची मानच कलंडते. आणि ती एकच बोंब करून उठते. पुन्हा वस्ती जमते. राधाक्काला स्मशानात न्यायची तयारी चाललेली



असते. बाया मात्र कुजबुजत असतात, 'शेवटी राधाक्काच्या सवतीने नेलंच तिला.'

एवढं बोलून विश्वास थांबतो. पाण्याचा घोट घेतो. आणि समोर प्रेक्षकांकडे बघतो. सारे प्रेक्षक त्याची गोष्ट ऐकण्यात गुंग झालेले असतात. तो थांबलाय हेही त्यांच्या लक्षात यायला काही क्षण जावे लागतात. स्त्रियांमध्ये दबक्या आवाजात रडणंही त्याला ऐकू येतं.

आणि तो आवेशात विचारतो, "सांगा, हा अंधश्रद्धेचा बळी नव्हता काय ? त्या देवर्षीनं तिचे हालहाल केले. तिच्यावर सगळ्यांसमोर अत्याचार केला. अघोरीपणानं वागला. पशुसुद्धा माना खाली घालतील त्याचं हे कृत्य पाहून. त्यानं तिचा जीव घेतला-नव्हे खून केला. पण, तरीही चुकीच्या कल्पना आणि रूढींमुळे तो मात्र सुटला. शेवटी अंधश्रद्धेचाच जय झाला."

क्षणभर थांबून विश्वास पुन्हा बोलायला लागला, "सांगा, हे योग्य आहे काय ? ती बिचारी आधीच रक्तक्षयाने रोगी झालेली.... अशक्त झालेली बाई ! तापात वाताचा झटका आला म्हणून बडबडायला लागली. तर आपल्या खुळ्या समजुतीनं तिच्यावर सवतीचं भूत संचारल्याचा अर्थ काढला. अशावेळी डॉक्टरांकडे न जाता देवर्ष्याला बोलावलं. आणि मग व्हायचं तेच झालं. अंधश्रद्धेने आणखी एक बळी दिला गेला."

# भुत-भुत

पटांगणात कालच्या पेक्षा आज जास्त गर्दी वाढलेली विश्वासला दिसत होती. लोकांच्या चेहऱ्यांवरून त्यांची कथा ऐकण्याची उत्सुकताही त्याला जाणवत होती.

विश्वास आज आणखी आत्मविश्वासाने उभा राहिला.

"भुत...भुत...मागून येतंय बघा! असं विश्वासनं म्हणताच दोन चार मुले बघायला लागली. खरं तर हे वाक्य वडगावच्या सोनूबाई परसातून आपल्या घरात शिरताना घाबऱ्याघुबऱ्या आवाजात बोलल्या होत्या. विश्वास एक क्षण थांबला आणि कथेची सुरुवात झाली.

सोनूबाई शिरल्या त्या धडपडतच; त्या अमावास्येच्या रात्री झोपेतून उठून परसदाराकडे गेल्या होत्या. त्यावेळी त्यांना तेथील चिंचेच्या झाडाखाली पांढऱ्याशुभ्र वेषात उभ्या असलेल्या एका तरुणीनं खूण करून बोलावलं होतं. एवढ्या रात्री ही इथं कशाला आलीय असा विचार करून त्या तिच्याजवळ गेल्या तिच्यापासून दहा पावलांच्या अंतरावर त्या पोहोचल्या असतील-नसतील तोच ती बाई अदृश्य झाली. सोनूबाई ते बघून भयभीत झाल्या आणि "भुत...भुत' असं ओरडत घरात शिरल्या.

घरातील मंडळी जागी झाली अन् काय झालं? काय झालं? म्हणून विचारू लागली अण्णांना - त्यांच्या पतिराजांना वाटलं कदाचित स्वप्नबिप्न पडलं असेल. पण अजूनही सोनूबाई त्या पसरदाराकडे अनामिक भीतीनं पहात होत्या. पाहता-पाहता त्यांची शुद्ध हरपली. शुद्धीवर येण्यास त्यांना तब्बल तीन तास लागले. पण त्या रात्रीनंतर त्या सतत भुताने झपाटल्यागत वागत होत्या.

त्यानंतर दोनच दिवसांनी दुसरी घटना घडली. एक तरुण आपल्या उसाच्या शेतातून रात्रीच्या वेळी खूप उशिरा घरी परतत होता. वाटेत त्याला एक सुंदर तरुणी भेटली. आपण वाट चुकल्यामुळे अशा भरकटत आलो आहोत हे तिने डोळ्यात आसवं आणून सांगितलं आणि त्याला तिच्या वडिलांकडे पोहोचवायला मदत करण्यास सांगितलं. तो तिच्यासह गप्पा मारत निघाला. थोडेसे अंतर चालून गेल्यानंतर त्याच्या असं लक्षात आलं की, ती त्याच्याशी



बोलतेय पण आजूबाजूला तर कुठेच दिसत नव्हती.

तो क्षणभर थांबला आणि काय घडते आहे याचा त्याला अंदाज आला. त्याच्या अंगाला दरदरून घाम फुटला. अंगात असेल तेवढं बळ एकवटून तो घराकडे पळत सुटला. धापा टाकत भेदरलेल्या अवस्थेत घरात शिरल्याबरोबर तो जो आडवा झाला तो पुन्हा उठलाच नाही. ह्या घटनेचाही गावभर बभ्रा झाला.

आणखी चार दिवसांनी एका रात्री १० वर्षाच्या एका मुलीला तिच्या अंगणात रात्रीच्या वेळी एक काळं कुत्रं दिसलं. त्याला हाकलून लावण्यासाठी तिनं दगड उचलून त्याच्या दिशेने भिरकावला. तो काय, त्या कुत्र्यानं अक्राळ विक्राळ रूप धारण केलं, ते बघूनच तिची वाचा गेली.

वडगावात अशा घटना अकस्मात घडायला लागल्या होत्या. गावातील सर्वांनाच खात्री पटली होती की, आपल्या गावाला भुतांनी झपाटलंय. यावर काही उपाय करायलाच हवा...अगदी तातडीनं असं सर्वांनाच वाटत होतं. मग त्या गावची मंडळी एकत्र जमली. अन् सर्वांनी एकमतानं ठरवलं की, ही भुताटकी नाहीशी करण्यासाठी पलीकडच्या जंगलातील महादेवाच्या देवळात वस्ती करून राहिलेल्या सिद्धयोगी महाराजांना बोलावायचं त्याच्याकडे असलेल्या अद्भुत शक्तीने आणि त्यांनी केलेल्या यज्ञामुळे ही भुते नक्कीच पळ काढतील असा साऱ्या गावकऱ्यांचा विश्वास होता.

सर्वानुमते पक्कं ठरल्यानंतर गावातील बुजुर्ग मंडळी त्या सिद्धयोग्याला बोलावयाला गेली.तेथे पोहोचल्यावर त्यांना असं दिसलं की, हा योगी ध्यान लावून बसला आहे. त्याचं ध्यान कसं मोडायचं म्हणून ते काही काळ वाट पाहू लागले. साधारण तासाभरानंतर तो योगी 'जय शिव शंभो' म्हणत ध्यान संपवून उठला. त्याबरोबर या सगळ्या मंडळीने धावत जाऊन त्याच्या पायावर लोटांगण घातलं.

"महाराज वाचवा," आमच्या गावाला भुतांनी घेरलंय. त्यांच्या तडाख्यातून आता तुम्हीच आम्हाला वाचवा." असं म्हणत की गयावया करू लागली.

महाराजांनी त्यांना शांत केलं. अन् विचारलं, "काय घडलंय ते सविस्तर सांगा. मग पाहू आपण उपाययोजना कशा काय करायची ते. भुत किती जबरी आहेत, ते पाहून यज्ञ कसा करायचा हे ठरवावं लागेल."

आलेल्या गावकऱ्यांपैकी म्होरक्यानं गावात काय काय घटना घडल्या त्या सविस्तरपणे सांगितल्या. त्या ऐकून चेहरा गंभीर करून सिद्धयोग्याने पुन्हा ध्यान लावलं. सारी मंडळी हात जोडून, आर्जवानं त्यांच्याकडे पाहत होती.

थोड्याच वेळात ध्यान संपवून योगी म्हणाले, "बालकांनो, मला आताच माझ्या दिव्य नेत्रांतून असं दिसलंय की तुमच्या गावाला सात भुतांनी झपाटलंय.

पैकी तीन भुतांनी आपला प्रताप दाखवलाय. उरलेली चार भुते या भुतांपेक्षाही क्रूर आहेत. ही तीन भुते, ज्यांनी तुमच्या समोर खेळ केले, ती या चार भुतांची मुले आहेत. ही भुते जर आपण त्यांचा वेळीच बंदोबस्त केला नाही तर साऱ्या गावाला हादरवून सोडतील." एवढं बोलून योगी क्षणभर त्यांच्याकडे पहात थांबला. सर्वांचे चेहरे भीतीनं गारठलेले होते. पुढच्या भयानकतेची काळजी त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होती.

योग्याला जाणवलं की माणसं आपल्या पूर्ण कह्यात आलीयत. त्याने ताबडतोब यज्ञाची तयारी करायला सांगितली. त्यासाठी लागणाऱ्या वस्तूंची यादीही दिली. येत्या सोमवारी शंकराच्या दिवशी यज्ञ करून शंकरदेवाला आवाहन करून त्याच्या गणांना घेऊन जाण्यासाठी यज्ञ करू. म्हणजे ही भुते शंकर भगवान येऊन घेऊन जातील असेही योग्याने त्यांना सांगितले.

योग्याच्या आश्वासनामुळे गावकऱ्यांच्या डोक्यावरील मोठा ताण कमी झाला ते उत्साहाने यज्ञाच्या तयारीला लागले. साऱ्या गावाने आनंदाने वर्गणी दिली आणि याची सिद्धता झाली.

सोमवारचा दिवस उगवला. दुपारी जेवणं आटोपून दोन वृद्ध माणसे त्या योग्याला आणण्यासाठी निघाली. काही लोकांनी गावकुसापर्यंत त्यांना साथ दिली व ते मागे फिरले.

साधारणत: रात्री ९ वा. त्या योग्यासह गावातील दोन वृद्ध माणसे आली. त्यांनी योग्याला तडक यज्ञाच्या जागी नेलं. तिथे आसपासच्या गावातील स्त्रीपुरुष, मुले, म्हातारे कोतारे असे सर्व जमले होते. तो पूजाविधी पहाण्यासाठी सारेच आतुर होते.

शुभ्र दाढी, झुळझुळती पिवळी कफनी, छातीवर रुळणारी बोराएवढी जाड असलेली रुद्राक्षाची माळ, कपाळावर विभुतीचा दाट पट्टा अशा वेशात तो योगी यज्ञवेदीच्या समोरच्या पाटावर बसला होता. त्याच्यासमोर तीन पितळी दिवे, फुले-फळे, विविध धान्यांनी भरलेली तबकं, त्याच्या उजव्या बाजुला दगडांच्या चुलीवर एक पितळी कढई, त्याच्याच पलिकडे खोबऱ्याचे तेल, खाण्याचे तेल, तूप इ. अनेक वस्तू मांडल्या होत्या.

सगळी मांडामांड नीट झाली आहे ना हे एकवार पाहून तो योगी संस्कृत मध्ये काही मंत्रघोष करु लागला. आणि त्याचबरोबर यज्ञात तुपातेलाच्या आहुत्या वाहू लागला. हे मंत्रपठण जवळपास दोन तास चालले होते. ते संपल्यानंतर त्याने ध्यान लावले. त्यावेळेला त्याने जीभ बाहेर लोंबत ठेवली होती. हे पाहून त्या योग्याच्या शिष्याने एक कापूरवडी घेऊन पेटवली आणि योगाच्या लोंबत्या जिभेवर ठेवली. जिभेवर एक लवलवती ज्वाला दिसू



लागली. अन् क्षणार्धात त्याने तोंड बंद केले. मग ती विझलेली कापूरवडी त्याने बाहेर थुंकून टाकली. हा प्रकार त्याने तीनदा केला. हे होत असतांना प्रत्येक वेळेला गावकरी 'जय शिव शंभो' चा गजर करीत होते.

नंतर तो पद्मासन सोडून मांडी घालून बसला. आणि उजव्या पायाचा अंगठा डाव्या हाताने, तर डाव्या पायाचा अंगठा उजव्या हाताने धरून तो बसून राहिला. मग त्या योगाने गावातील सर्वात वृद्ध गावकऱ्याला जवळ बोलावून त्याची नाडी पहाण्यास सांगितले. तो वृद्ध त्याच्या जवळ गेला, अन् मनगटावर हात ठेवून नाडी तपासू लागला. काही वेळाने त्याच्या चेहऱ्यावर आश्चर्याचे भाव उमटू लागले. तो जवळ जवळ ओरडलाच, 'महाराजांची नाडी बंद झालीय. हे ऐकताच सर्वांनी 'जय शिवशंभो' चा जयजयकार केला. त्यानंतर आणखी दोन-तीन जणांना योग्याने नाडी तपासायला सांगितली प्रत्येकजण नाडी थांबली म्हणून ओरडायचा; आणि प्रत्येकवेळी जय शिवशंभोचा जयजयकार व्हायचा.

या अद्‌भूत चमत्कारानंतर त्या योग्याने शिष्याला पितळी कढईत तेल ओतून ते उकळावयास सांगितले. त्या शिष्याने मांडलेल्या तेलाच्या बाटल्या कढईत उपड्या केल्या. थोड्या वेळाच तेल उकळू लागले. तेल उकळू लागताच योग्याने तीन लिंबे हातात घेतली. त्यावर फुंकर मारुन व मंत्र पुटपुटून त्यांना 'पवित्र केले. मग त्याचे बरोबर दोन काप करून, त्याचे त्यांना उकळत्या तेलात सोडून दिले.

तेल खळखळून उकळू लागताच योग्याने सांगितले की, ज्या कोणाला भुतबाधेपासून त्रास होऊ नये असे वाटत असेल त्यांनी पुढे यावे. तो आता काय करणार याची काहीच कल्पना नसल्यामुळे, एकदम पुढे यायला लोक घाबरले. मग धीर करून त्यां गावचा तो वृद्धच पुढे आला. त्याने त्या योग्यासमोर गुडघे टेकवले अन् मान खाली घालून बसला. योग्याने त्या उकळत्या तेलावरील दाट वाफांना फुंकून दूर केले. अन् पुढच्याक्षणीच सर्वांना थक्क करून सोडणारी घटना घडली. त्याने उजव्या हाताची बोटे त्या उकळत्या तेलात घातली व झटकन बाहेर काढून त्याच्या डाव्या हातावर घासली. मग हातावरचे थोडेसे तेल त्या वृद्धाच्या कपाळावर पुसून त्याला जाण्याची खूण केली. अशा प्रकारे सर्वांना त्याने तेल लावले. एकदा का उकळत्या तेलात हात बुचकळला की तो पाचसहा लोकांना पुरत असे. पण प्रत्येक वेळी वाफेचा दाट थर आधी फुंकून दूर करत असे. नंतर नंतर तो संपूर्ण पंजाच बुडवायला लागला होता.

हा विधी आटोपल्यानंतर त्याने त्याच्या पोतडीतून एक गोल कवटी काढली आणि समोर उभी ठेवली. नंतर सात कवड्या काढल्या. एक कवडी कवटीच्या

डोक्यावर मध्यभागी ठेवली व इतर सहा कवड्या तिच्या भोवती गोलाकार मांडल्या. मग स्वतःबरोबर आणलेल्या तीर्थाची बाटली काढून योगी बोलू लागला, "मला असे दिसते आहे की, या गावाला सात भुतांनी झपाटलंय. त्यातील काही पुरुष भुते आहेत, काही स्त्री भुते, तर काही त्यांची मुले. त्यातील एक पुरुष भुत खूप ताकदवान आहे. मी या कवटीच्या मधोमध ठेवलेली कवडी म्हणजे ते भुत आहे. त्याच्याभोवतीच्या कवड्या म्हणजे इतर सहा भुते. मी जेव्हा हे तीर्थ त्या कवड्यांवर टाकून मंत्र म्हणेन, तेव्हा जी भुते सोडायला तयार असतील, ती या कवटीवरून घरंगळत खाली पडतील आणि जी सोडायलातयार नसतील ती तशीच कवटीवर स्थिर रहातील आणि तसं घडलं तर त्या भुतांना हाकलून लावण्यासाठी परत यज्ञविधी करावा लागेल."

एवढे बोलून त्याने त्या सातही कवड्यांवर तीर्थ ओतायला सुरवात केली आणि मंत्र पुटपुटायला लागला. सर्व गावकरी काय होणार ते धडधडत्या अंतःकरणाने कवटी व त्यावरील कवड्यांकडे पहात होते. रात्रीचे १२ वाजले होते. तीर्थ ओतल्यानंतर क्षणातच त्या निर्जीव कवड्या सजीव झाल्याप्रमाणे हालचाल करू लागल्या. जणू काही ती कवडीरुपी भुते कुणीतरी आपला जीव घेतोय या भीतीने हालचाल करीत असल्याचे जाणवत होते. हळूहळू त्या एकमेकींपासून दूर सरकायला लागल्या सारे जण हा खेळ श्वास रोखून पहात होते. मधली कवडी सोडून इतर सर्व कवड्या त्या कवटीवरून घसरून खाली पडल्या. हे पाहून लोकांना वाटले सर्व भुते गेली. पण, हे ताकदवान भुत जायला तयार नाहीय.

हे पाहून साधूने पुन्हा काही ध्यान लावले आणि बोलू लागाल, "हे भुत तसंच जायला तयार नाहीय. ते या यज्ञात एका कोंबड्याची आहुती मागतंय. तो आहुती दिल्यावरच जाईन म्हणतो."

ताबडतोब एक कोंबडा आणला गेला. त्याची पिसं काढून त्याला योग्याच्या हाती सोपवला. कोंबडा हातात आल्याबरोबर योग्याने त्याच्या तंगड्या पकडून उलटा केला. त्या कोंबड्यावर हळदकुंकू वाहून डाव्या हातात चाकू घेतला. मंत्र पुटपुटत क्षणात त्याची मान छाटली. त्याच्या रक्ताची धार यज्ञात आहुती म्हणून दिली गेली. मग कोंबडा शिजवण्यासाठी पाठवला गेला.

हे होतंय न् होतंय तोच इकडे कवटीवर उरलेली एक कवडी आता हालचाल करू लागली होती. बघता बघता तिची हालचाल वाढली. आणि झटकन ती खाली पडली. गावकऱ्यांनी सुटकेचा निश्वास सोडला.

समाधानी चेहरा करून योगी म्हणाला, "आता तुम्ही निश्चिंत रहा. साऱ्या भुतांनी गाव सोडलंय." हा सर्व विधी संपेपर्यंत दोन वाजायला आले होते. उत्तर



रात्र सुरू झाली होती. कोंदट वातावरण गार वाऱ्यानं मोकळं होत होतं. लोकांना वाटलं भुतांनी गाव सोडल्यामुळेच कोंदटपणा कमी होतोय.

लोकांच्या वतीने त्या वृद्ध माणसाने सिद्धयोग्यास एक थैली कृतज्ञतापूर्वक अर्पण केली. आणि गावाला भुतांच्या त्रासातून मुक्त केल्याबद्दल गावकऱ्यांच्या वतीनं आभारही मानले. दुसऱ्या दिवशी सकाळी गाव सोडून पुन्हा आपल्या शंकराच्या देवळाकडे जाण्यापूर्वी योग्याने सर्वांना दर्शन दिलं. ते दर्शन घेत असतांना गावकरी त्याच्या पुढे दक्षिणा, फळफळावळ इ. नम्रपणे ठेवत होते. अन् योगी त्यांना विशेष आशीर्वाद देत होता.

इथपर्यंत कथा सांगून झाल्यावर विश्वास क्षणभर थांबला. पाणी प्याला आणि त्याने आपल्या मित्रांना एक टेबल आणायला सांगितले की, ज्यावर सर्व प्रयोगाचं साहित्य मांडून ठेवलं होतं. तसं ते टेबल व्यासपीठावर आणण्यात आलं.

पुन्हा विश्वास बोलू लागला.

मित्रांनो, आपल्या सर्वांना वाटतं की, या योग्यामुळे त्या गावची भुतं पळाली. कारण आपलाही भुताखेतांवर त्यांच्या झपाटण्यावर, भुत उतरवणाऱ्या योगी मंडळींवरही आपला विश्वास असतो.

पण मला सांगा, तुमच्या पैकी कुणी भुत पाहिलंय काय? भुताचे पाय उलटे असतात. काही भुतांना तर मुंडकंच नसतं. त्यांची सावली पडत नाही. हे सर्व कुणी पाहिलंय असा एकही माणूस या भुतलावर आपल्याला सापडणार नाही. आपण सर्वांनी लहानपणापासून ह्या सर्व सांगोवांगीच्या गोष्टी ऐकलेल्या असतात. आपल्या मनातील भीती या गोष्टींना थारा देत असते. नकळत लहानपणापासून आपल्यावर हे संस्कार घडत असल्यामुळे आपण भुत आहे असे समजून चालतो. लहान मुलांना, आपलं त्यांनी ऐकलं नाही तर आपण त्यांना भुताची भीती घालतो.

यातूनच हळव्या माणसांना, संवेदनाशील मनांना - मग ती माणसे शरीराने कितीही धडधाकट का असेनात-भास होऊ लागतात. आणि भुताचा जन्म होतो.

आपल्या या समजुती बळकट करण्याचं काम हे ढोंगी साधूबुवा करत असतात. कारण आपल्या या खुळ्या समजुतींवरच त्यांच जीवन ते कुठलेही कष्ट न करता सुखात घालवू शकतात. हा एकप्रकारे त्यांचा धंदाच असतो. आपण मात्र उगीचच पाच रुपयांच्या जादूच्या प्रयोगासाठी पाचशे रुपये खर्च करत असतो; आणि खोट्या समाधानात जगतो.

खरं तर ज्यांना भुतबाधा झाली आहे अशी माणसं मानसिक रोगाची शिकार झालेली असतात. 'स्किझोफ्रीनिया' किंवा 'हिस्टेरिया' या नावांनी ओळखले

जाणारे ते रोग आहेत. त्यांचा उपचार मनोरुग्णतज्ञांकडेच जाऊन केला पाहिजे. नाहीतर हा रोग हाताबाहेर जाऊन शेवटी माणसाचा जीव घेतो. तेव्हाही आपल्या खुळ्या समजुतीमुळे त्याचा जीव भुताने घेतला असेच आपण समजतो. पण खरं तर एकप्रकारे त्याचा जीव आपणच योग्य ते उपचार न केल्यामुळे घेतलेला असतो.

मनोरुग्णतज्ञाकडे फक्त वेड्या माणसांनाच नेतात. ही सुद्धा आपली आणखी एक खुळी समजूत आहे. म्हणूनच आपण या बुवांचा प्रसार होण्यासाठी हातभार लावतो कारण बुवांकडे जाण्यात एकप्रकारची सामाजिक प्रतिष्ठा आहे असे आपल्यास वाटते. तर मानसोपचार-तज्ञाकडे गेल्यावर 'वेडा' असा शिक्का बसण्याची भीती वाटत असते.

आजच्या कथेत त्या सिद्धयोगी महाराजाने जे जे चमत्कार करून दाखवले ते सर्व मी तुम्हाला आता करून दाखविणार आहे. त्यानंतर त्यांचा उलगडाही होईल.

असं म्हणून त्याने त्याच्या मित्रांना मदतीला घेऊन एकेक चमत्कार करायला सुरुवात केली. इकडे प्रेक्षक वर्ग चमत्कार व्यवस्थितपणे पहाता यावेत म्हणून दाटी करून जवळ येऊन बसला. सगळीकडे शांतता पसरली."चमत्कार सदृश प्रयोग सुरू करण्यापूर्वी माझी तुम्हाला एक सूचना आहे." विश्वास म्हणाला, "प्रत्येक प्रयोगाच्यावेळी मला तो प्रयोग तुमच्यापैकी कुणी न् कुणीतरी पुढे येऊन करून दाखविला पाहिजे."

आणि मग तब्बल अर्धा तास विश्वासचे सिद्धयोग्याप्रमाणे प्रयोग चालू होते. प्रेक्षक ते पाहून अचंबा करीत होते.

प्रयोग संपले. विश्वास त्यामागील वैज्ञानिक रहस्य सांगायला उभा राहिला.

मी किंवा त्या योग्याने जे काही केले ते आश्चर्यकारक असे काहीच नव्हते. हे होते साधे वैज्ञानिक प्रयोग.

जळता कापूर जेव्हा जिभेवर ठेवला जातो; वा तळहातांवर नाचवला जातो, तेव्हा ती प्रत्येक क्रिया तीन-तीन सेकंदाच्या आत करावयाची असते. कारण शरीरावरील कुठलीही संवेदना मेंदूपर्यंत पोहोचायला व मेंदूकडून संवेदनेची जाणीव होण्याची आज्ञा यायला तीन सेकंदाचा काळ लागतो. त्यामुळे त्या कालावधीच्या आत एखादी घटना घडली तर ती मेंदूपर्यंत पोहोचतच नाही. मग चटका कसा बसणार ? दुसरं असं की जिभेवर जळता कापूर ठेवण्याच्या आधी एक खोल श्वास घेतलेला असतो. जेव्हा कापूर जळत असताना जिभेवर ठेवला जातो, तेव्हा हळूहळू उच्छ्वासाची क्रिया सुरू करण्याची म्हणजे ज्वालांना फुंकर लागून त्या तोंडावाटे बाहेर पडतात आणि मोठा जाळ झाल्यासारखाही दिसतो.



काही ठिकाणी आगीच्या फुलत्या निखाऱ्यावरून चालून दाखविण्याचा चमत्कार केला जातो. तेथेही तीन सेकंदाचं रहस्य सांभाळून चाललं की काम भागतं.

तसंच काहीसं उकळत्या तेलात हात घालण्याच्या प्रयोगाच्याबाबत असतं. मुळात आपल्याला आग किंवा तेलाचा चटका कसा असतो याची कल्पना असते. त्यावरून आपण अंदाज बांधतो की, ज्याअर्थी या माणसास आग हातात घेऊनही भाजत नाही, वा उकळत्या तेलात हात टाकूनही चटका बसत नाही; म्हणजे ह्याच्याकडे काहीतरी दैवी शक्ती असली पाहिजे. एकदा का ह्या दैवी शक्तीवर आपला विश्वास बसला की, त्याला सारं रान मोकळं असतं.

तुम्ही पाहिलं असेल की उकळत्या तेलात हात घालण्यापूर्वी त्यावरील दाट वाफेचा थर आधी बाजूला केला होता. त्यात लिबाच्या फोडी वा रस ओतल्यामुळे झालं काय की, तेलाच्या पृष्ठभागावर रसातील पाण्याचा थर जमला . त्यामुळे तेलाचे तपमान १०० सेल्सीयसच्यावर जाऊच शकले नव्हते. शिवाय पाण्याची वेगाने वाफ होत असल्यामुळे उकळत्या तेलाच्या पृष्ठभागाचे तपमान आणखी कमी होते ते वेगळेच. तरीसुद्धा त्या तेलाचे तपमान खूपच असते. पण भाजण्याइतके नाही. वाफेचा चटका उकळत्या पाण्यापेक्षा जास्त असतो. कारण वाफेची उष्णता जास्त असते. हा आपला अनुभव आहेच. म्हणून हात बुडवण्यापूर्वी वाफ बाजूला केली जाते. त्यामुळे तपमान आणखी कमी होण्यास मदत होते. अशा वेळी हात झटकन बुडवून तीन सेकंदाच्या आत बाहेर काढला व डाव्या हातावर चोळला की जरासा लागलेला चटका सहन करता येतो. मग ते तेल भुतबाधा घालविण्याची जाणीव व्हावी म्हणून कपाळाला फासले जाते. जर तेलात कापलेले लिंबू वा त्याचा रस टाकला नसता तर, त्या योग्यालासुद्धा तेलात हात बुडवता आला नसता.

आता वळूया नाडीकडे. नाडी बंद करण्याचा प्रकार दोन पद्धतीने करता येतो. एका पद्धतीत जास्तीत जास्त श्वास रोखून धरायचा म्हणजे नाडी बंद पडते. तर दुसऱ्या पद्धतीत काखेत बटाटा बांधून ठेवायचा. त्यामुळे काखेतून हातात रक्तपुरवठा करणाऱ्या रक्तवाहिनीवर दाब पडतो. थोड्याच वेळात तुमचा श्वासोच्छ्वास जरी चालू असला, तरी तुमची नाडी मात्र बंद पडल्याचा भास होतो. पण हा प्रकार जास्तवेळ बंद राहिल्यास हाताचा तो भाग लुळा पडून निकामी होतो.

त्या सिद्धयोग्याने केलेल्या प्रयोगांपैकी शेवटचा प्रयोग होता, कवडी नाचवण्याचा. ही तर सर्वात मोठी धूळफेक होती. कवटी ही निव्वळ देखाव्या करिता आणि परिणाम साधण्याकरता होती. तसंच तिच्या डोक्यावरील

गुळगुळीतपणा कवड्यांना सरकायला सोपाही होता. कवड्यांवर म्हणजे भुतांवर जेव्हा मंत्रून तीर्थ टाकण्यात आले, तेव्हा निर्जीव कवड्या हालचाल करू लागल्या. त्या जिवंत झाल्याप्रमाणे लटकू लागल्या. जशी काही भुते आळोखेपिळोखे देत मंतरलेल्या पाण्याच्या त्रासाला घाबरून पळताहेत. खरी गंमत अशी होती की, ते 'तीर्थ' म्हणजे कुठलंही आम्ल असतं.अगदी लिंबाचा रससुद्धा चालतो.कारण त्यात सायट्रीक आम्ल असतं. कवड्या कॅल्शीयम कार्बोनेटच्या बनलेल्या असतात. जेव्हा 'तीर्थ' कवड्यावर पडतं. तेव्हा त्यातील आम्लाची कवड्यांच्या कॅल्शीयम कार्बोनेटवर रासायनिक प्रक्रिया सुरू होते. त्यातून कार्बन डायॉक्साईड वायू जो आपण उच्छ्वासावाटे सोडतो तोच तयार होतो. त्याचे डोळ्यांना दिसू न शकणारे हजारो बुडबुडे तयार होऊन कवड्यांतून बाहेर पडू लागतात, आणि फुटू लागतात. त्यामुळे जो दाब तयार होतो. त्याच्या आधारे ह्या कवड्या गुळगुळीत भागावरून घसरायला लागतात, आणि योगी भुतं गाव सोडून गेल्याचा बहाणा करतात. आपण त्यालाही बिदागी देऊन समाधानाने ( ?) परततो.



## हडळीचा जन्म

"या घटनेला योगागयोगाने मीच साक्षी आहे". अशी सुरुवात करून विश्वास कथा सांगायला उभा राहिला.

त्याचं काय झालं, माझ्या कॉलेजची परीक्षा संपली होती. बरेच दिवसात आईबाबांना भेटले नसल्याने मी गावी जायचं ठरवलं. अन् मी गावी गेलोही. आईबाबांना मी आल्याचा खूप आनंद झाला.

आमचं ओसाडवाडी गाव नावाप्रमाणेच ओसाड होतं. पाण्याची टंचाई तर पाचवीलाच पुजलेली होती. मैलन् मैल अंतरावरून पाणी आणायला लागायचं. आम्ही ज्या ठिकाणी रहात होतो, त्याच्याजवळच गावचं स्मशान होतं. आमच्या घराला आणि गावाच्या मुख्य रस्त्याला जोडणारी गल्ली त्या स्मशानावरूनच जात होती.

त्या स्मशानाविषयीच्या अनेक दंतकथा आमच्या गावी फैलावल्या होत्या. बाया माणसं तर दिवसाही त्या गल्लीतून जायला घाबरत. सूर्यास्तानंतर तर जवळ जवळ ती गल्ली ओस पडे. त्या गल्लीत रात्रीच्या वेळी दिवेही नसत. त्यामुळे तिच्या भयानकतेत आणखीच भर पडली होती. अगदी जरूरीचे काम असेल तरच गावकरी रात्री बाहेर पडत असत. नाहीतर त्या गल्लीत खरोखरच स्मशानशांतता असे. आवाज येई तो फक्त रातकिड्यांच्या किरकिरण्याचा.

तेथे स्वत:च्या डोळ्याने भूत पाहिल्याचे अनेक लोक छातीठोकपणे सांगत. तर अनेकदा भुतांनी रात्री आपला पाठलाग केला आहे, असे सांगणारेही भरपूर होते. या स्मशानाशेजारून जाताना असंख्य भुते तोंडातून ज्वाला काढत प्रेताभोवती नाचत असतानाही अनेकांनी पाहिले होते. स्मशानाच्या आसपास रहाणाऱ्या लोकांनी तर या स्मशानातून रात्रीच्या वेळी भुतांच्या भयाण अणि भेसूर किंकाळ्याही ऐकल्या होत्या.

मी गावी पोहोचल्याच्या चार दिवस आधी आमच्या शेजारच्या पांडुरंगाला - जो माझा गावातला बालपणापासून मित्र होता त्याला - रात्री गल्लीतून येताना एका हडळीनं झपाटलं होतं. हे कळल्यावर मी पोहचताच त्याला भेटायला गेले.

पहातो तो पांडुरंग अस्वस्थतेने येरझारा घालत होता. तोंडानेही काहीतरी पुटपुटत होता. त्यानं माझ्याकडं पाहिलं आणि मला त्याची कीव आली. हा

चांगला धडधाकट माणूस चार दिवसांत पार खंगला होता. डोळे आत गेले होते आणि निस्तेज झाले होते. जसा काही एकदम मोठ्या आजारानं तो जर्जर झालाय अशी त्याची अवस्था झाली होती.

बोलण्याच्या ओघात वहिनींनी पांडुरंगच्या बायकोने सांगितलं की, कालच मांत्रिक येऊन ती हडळ उतरवून गेलाय, त्यामुळे निदान आज तरी हे शुद्धीवर आहेत. त्यांची बडबड कमी झालीय.

मी त्याला विश्वासात घेऊन आस्थेनं काय घडलं ते व्यवस्थितपणे सांगायला सांगितलं. प्रथम तो त्या आठवणींनी अस्वस्थ झाला. पुन्हा मी धीर दिल्यानंतर आणि मंत्रिकानं हडळ घालवल्याचं समजावल्यावर तो हळू हळू काय घडलं ते सांगू लागला.

पाच दिवसांपूर्वीची गोष्ट बघ. त्या दिवशी संध्याकाळी कामावरून नुकताच घरी आलो होतो. दिवेलागणीची वेळ होती. तेवढ्यात रखमा म्हणाली की, आता बाजारात जायला हवंय. घरातील रॉकेल व दिव्याचं तेल संपलय. अजुन स्वयंपाकही व्हायचा आहे. रॉकेलमुळे सारंच अडून बसलंय. मी रागावलो. रात्रीच्या वेळी त्या गल्लीतून मुख्य रस्त्यावर जावं लागणार होतं. बरं एकाकी जाऊनही चालण्यासारखं नव्हतं. मी वैतागून तिला म्हणालो देखील की, सकाळीच जर सांगितलं असतं तर संध्याकाळी परतताना नसतं का आणलं? पण आता उपयोग नव्हता. म्हणून मी हातात दिवटी घेतली अन् बाटल्या घेऊन बाहेर पडलो.

गल्लीत संपूर्ण अंधार पसरला होता. माझ्याशिवाय त्या गल्लीत चिटपाखरूदेखील नव्हतं. मला भीती वाटू लागली. स्मशानात तासाभरापूर्वीच प्रेत जाळलं होतं. त्याचा वासही गल्लीत दरवळत होता. मी जोराने रामरक्षा म्हणायला सुरुवात केली. अन् झपाझप पावलं टाकीत एकदाची गल्ली ओलांडली. मुख्य रस्त्याशी आल्यावर कोपऱ्यातल्याच पन्नालाल शेटच्या दुकानात शिरलो.

त्याच्याकडून रॉकेल व तेल घेऊन जायला निघालो. तोच पन्नालाल शेट काही विषय काढून गप्पा मारायला लागला. तसा पन्नालाल गपिष्ट आहे हे तुला माहीतच आहे. मीही त्याच्या गप्पांच्या नादात अडकलो. अन् घरी परतायला उशीर होतोय हे विसरलो.

काही मिनिटांपूर्वी दुकानात आलेला छोटा मुलगा, त्याला भुताने पाठीमागुन ढकलल्यामुळे, तो खड्ड्यात कसा पडला आणि भीतीने थरथरणाऱ्या त्या एका मजुराच्या साह्याने कसा घरी पोहोचवला याविषयी पन्नालाल सांगत असताना मी देखिल त्याला म्हणालो, की स्मशानाजवळ अचानक दिसणाऱ्या व अदृश्य



होणाऱ्या त्या आकृत्या मीही पाहिल्या आहेत.

एकदम माझं घड्याळाकडे लक्ष गेलं. साडेनऊ वाजायला आले होते. बराच उशीर झाला होता. पन्नालालकडून एक खिळा मागून घेतला अन् निघालो. रस्त्यात चालताना तो खिळा तोंडात धरला. लोखंडाजवळ भुते फिरकत नाहीत ना, म्हणूनच ही खबरदारी घेतली होती.

थोडं अंतर मी चाललो असेन–नसेन तोच माझ्या मागून कुणीतरी येत असल्याचा भास झाला. चला, चांगली सोबत होईल, म्हणून मी थांबून मागे वळून पाहिले तर मागे कुणीच नव्हते. माझी भीती वाढू लागली. पण मनाला समजावलं भास झाला आणि पुन्हा पुढे चालायला लागलो. तोंडात खिळा असल्यामुळे थोडा धीर होता. कान मात्र मागेच होते, पुन्हा चालण्याचा आवाज आला. नक्कीच कुणीतरी माझा पाठलाग करत होतं. स्मशानही शेजारीच होतं. मागे पाहीलं तर कुणीच दिसत नव्हतं. आता मात्र धीर सुटायला लागला होता. म्हणून झपाझप चालायला लागलो. पाठीमागूनही चालताना पायाखालची पाने चुरगळल्याचा आवाज वाढायला लागला होता. नकळत मी एकदम मागे वळून पाहिले. साधारण वीस पावलांवर एका स्त्रीच्या सावलीसारखी आकृती दबकत दबकत येताना दिसली. ते पाहून मी हादरलोच. आणि एकदम थांबलो. ती सावलीही थांबली.

अशा निर्जन किर्ऽऽ अंधाराच्या गल्लीत थाबणं योग्य नाही असं वाटून मी भराभर पावलं उचलून चालू लागलो. मनात विचार आला आपण थांबलो असतो तर लगेच त्या सावलीनं आपल्यावर हल्ला केला असता; मग आपलं काय झालं असतं हे विचार करत असतानाच मला मागे बघायची इच्छा झाली. पण मी मागे न बघता पळू लागलो. मागून आवाजही त्याच वेगाने येता आहे असं वाटलं. म्हणून मी गर्रकन मागे वळून पुन्हा थांबलो. तो ती सावलीही एकदम थांबली.

आता मात्र माझी खात्रीच झाली की हे भुत आता आपल्यावर हल्लाच चढवणार. माझ्या पायातली शक्तिच संपली की काय मला वाटू लागलं. मला दरदरून घाम सुटला. पण माझ्या अंतर्मनानं कशी काय उचल खाल्ली देव जाणो. मी अंगात असेल नसेल तेवढं बळ एकवटलं अन् घराच्या दिशेने पळत सुटलो. पळताना मागून सावलीदेखील पळत असल्याचा आवाज येत होता.

मी जेव्हा घराच्या फाटकात शिरलो आणि मागे वळून पाहिलं तो ते भुत नाहीसं झालेलं होतं. माझ्या हातातला दिवटा केव्हाच कुठे गळून पडला होता याची मला शुद्धच नव्हती. तोंडातील खिळा तर केव्हाच पडला होता. कसाबसा घरात शिरलो. बाटल्या ठेवल्या अन् पलंगावर धाडकन् कोसळलो. त्या

आवाजाने बायको धावत आली.

माझा एकंदर अवतार पाहून अन् मी धापा टाकत असलेला पाहून तीही खूप घाबरली. तिने मला पाणी आणून दिलं. कसंबसं एक घोट घेतलं तर ते लगेच उलटी होऊन बाहेर पडलं. पंधरावीस मिनिटांनी मी वेड्यासारखा बडबडायला लागलो. त्या रात्री आम्ही दोघं न जेवता तसेच झोपून गेलो.

रात्री एक वाजता मी अचानक एक मोठी किंकाळी फोडून जागा झालो. त्या किंकाळीने माझी बायकोदेखील जागी झाली. आणि काय झालं ? काय झालं ? काही स्वप्न पडलं का ? असं घाबऱ्याघुबऱ्या स्वरात विचारू लागली. तिला उत्तर द्यायला मी शुद्धीवर होते कुठे ? मी म्हणे शुन्यात नजर लावून काहीतरी असंबध्द बडबडत होतो.

दुसऱ्या दिवशी मी कामावर जाण्याच्या स्थितीत नव्हतोच. माझी सारखी काहीतरी असंबध्द बडबड चालू होती. आता बायको सांगतेय की त्या बडबडीत मी शेजारच्या कुसुमचं की, जी कौमार्यात गरोदर असतानाच मेली होती, तिचं नाव घेत होतो आणि मला मूल जगवायच असं काहीतरी बडबडत होतो.

तर तिनं माझे हे वेडेचार पाहून तिच्या गावातच रहाणाऱ्या आईवडिलांना बोलावलं, तोपर्यंत शेजाऱ्यापाजाऱ्यांना बातमी कळवली होती. माझ्या घरासमोर ही गर्दी जमली ते आल्यानंतर, त्यांनी माझी परिस्थिती पाहिली आणि मंत्रिकाला बोलावलं पाहिजे, असं ठरवलं.

मांत्रिक आला. त्याने माझ्याकडे पाहिलं आणि पोतडीतून दोन पुडया काढल्या. पाणी मागवलं. एका पुडीतील पावडर पाण्यात कालवली. आणि दुसऱ्या पुडीतील कुंकू माझ्या तळहातांवर चोळलं. चोळत असताना तोंडानं संस्कृत भाषेतून काही मंत्र पुटपुटत होता. मग त्याने ते पाणी व्यवस्थित ढवळलं. त्यामुळे ते द्रव पिवळ्या रंगाच झालं. मला खालच्या दिशेने हात जोडायला सांगितले. आणखी असंही म्हणाला की, मी जेव्हा हे मंतरलेलं पाणी तुझ्या हातावर सोडीन तेव्हा तू हातं धुतल्यासारखं करायचं.

मांत्रिकानं ढवळलेल्या पाण्याचा ग्लास हातात घेतला अन् बारीक धार माझ्या नमस्कार केलेल्या हातांवर धरली. मी हात धुऊ लागलो. तो काय माझ्या हातातून काळंकुट्ट पाणी खाली पडायला लागलं, ते त्याने खाली एका ताम्हणात गोळा केलं, हा विधी झाल्यानंतर तो मांत्रिक म्हणाला की, हे काळं पाणी आणि काळे हात असं दर्शविताहेत की, एका कुमारिका गरोदर बाईनं हडळ होऊन झपाटलंय या हडळीला उतरवायचा विधी करावा लागेल.

"कालच त्या मांत्रिकानं हडळ उतरवण्याचा विधी केला. त्याला जवळपास



साडेचारशे रुपये खर्च आला. जिवापेक्षा का पैसे मोठेयत ? माझा महिन्याचा अख्खा पगार त्यात गेला. ते काही का असेना जीव वाचला ना ? मग बस झालं" असं म्हणून पांडुरंग हडळ उतरवायच्या विधीबद्दल सांगू लागला.

त्यात मला समोर बसवून जवळ जवळ दोन तास मंत्रपठण व होमहवन केलं. शेवटी भूत गेलं की नाही हे पाहण्याचाही विधी केला. त्यानं मला मागच्या वेळेसारखंच नमस्कार करून उभं राहायला सांगितलं. मागच्या सारख्याच दोन पुडया बाहेर काढल्या. एका पुडीतली पावडर पाण्यात टाकून ढवळली व दुसऱ्यातील पूड माझ्या तळव्यांना चोळली. मागल्या वेळेसारखीच त्यानं मंतरलेल्या पाण्याची धार माझ्या हातावर धरली. मी हात धुऊ लागलो. अन् काय आश्चर्य ! या वेळेस लाल रंगासारखं-अगदी रक्तासारखं पाणी पडू लागलं. त्यानं ते पाणी ताम्हनात घेतलं. अन् म्हणाला की, ती हडळ रक्त ओकून तुझ्यातून निघून गेली आहे. असा याचा अर्थ आहे.असं सांगून पैसे घेऊन तो निघून गेला. भूत गेल्याचा मलाही विश्वास पटलाय, पण अस्वस्थपणा काही जात नाहीय.

एवढं बोलून पांडुरंगने त्याची कहाणी संपवली. पण मला मात्र या भूत उतरवण्याच्या विधीवर आणि मांत्रिकावर संशय येत होता. मला सारखं वाटत होतं, हे सगळे पांडुरंगाच्या मनाचे खेळ आहेत म्हणून. पण तसं काही न दाखवता मी चार सांत्वनाचे शब्द बोलून उठलो.

पांडुरंगकडून आल्यानंतर मी सारखा विचार करीत होतो. केव्हा डोळा लागला कळलंच नाही, संध्याकाळी जाग आली, ती आईच्या हाकेनंच. मी डोळे चोळत उठलो. उठून तोंड धुतलं. तेवढयात आईनं चहाचा कपही आणून दिला. आणि शेजारच्या प्रियाकडे गप्पा मारायला बाहेर पडलो.

प्रियाशी बोलतांना गप्पांच्या ओघात मी सकाळी पांडुरंगकडून ऐकलेली हकीकत तिला सांगितली. तर ती खो खो करून हसायलाच लागली. मला कळेना ह्या हकीकतीत हसण्यासारखं काय आहे ते. मी तिला म्हणालो,"तो बिचारा तिकडे अर्धमेला झालाय, अन् तू इकडे हसतेस ? काही लाज !"

माझ्या या बोलण्यावर ती हसणं थांबवून अचानक गंभीर झाली. गंभीर होऊन ती म्हणाली.'विश्वास, पांडुरंगला हडळीने झपाटलंय हे मला माहीत होतं. पण ती हडळ मीच निघेन हे नव्हतं मला माहीत."

"काऽऽय ?" मी उडालोच. मला कळेना ही काय बोलतेय. मी तिला गदागदा हालवून विचारलं, "तू काय बोलतेयस याचं तुला भान आहे ना ?"ती मुसमुसत रडायला लागली. आणि सांगू लागली," कॉलेजला सुट्टी लागली म्हणून मी घरी यायला निघाले होते. त्या दिवशी संध्याकाळी सहा वाजता पोहोचणारी एसटी रात्री नऊ वाजता पोहोचली अन् मला रात्री गल्लीतून

यायला भीती वाटायला लागली. गल्लीच्या टोकावर एका बाजूला उभी राहून सोबतीची वाट पाहू लागले. अशी कितीवेळ रस्त्यावर उभी राहणार म्हणून मी पन्नालालशेटकडे मदतीसाठी जाणारच होते. एवढयात त्यांच्या दुकानात पांडुरंग दिसला. माझा जीव भांडयात पडला नि तो निघायची वाट पहात थांबले."

"तो निघाला तशी मीही माझी पिशवी हाताशी घट्ट धरून त्याच्या मागोमाग निघाले. पण रात्रीच्या वेळी अशा निर्जन गल्लीत परक्या पुरुषाबरोबर जायची भीती वाटल्यामुळे मी काही अंतर ठेवून त्याच्या मागोमाग चालू लागले. मध्ये तो थांबला अन् मागे वळून बघू लागला तेव्हा मी झाडाआड लपले. उगीच जास्त जवळ जायला नको म्हणून. मग तो झपझप चालू लागला. अंतर वाढेल या भीतीनं मीही त्याच्या चालण्याएवढाच वेग वाढवला. तो पुन्हा एकदा थांबला. तेव्हा घाबरून मीही थांबले. शेवटी तो पळायला लागल्यामुळे मीही पळायला लागले. अन् कशीबशी घरात शिरले. आईनं एवढया शिव्या घातल्याय म्हणून सांगू तुला."

"अग, पण तुझ्यामुळे एवढं रामायण घडलं त्याचं काय ?" मी विचार करू लागलो. मी तिला म्हटलं, "चल, ताबडतोब त्याच्याकडे जाऊ अन् ही हकीकत त्याला सांगू. म्हणजे बिचारा एका ओझ्यातून मोकळा तरी होईल."

तसेच तिला पांडुरंगकडे घेवून गेलो. आणि त्या रात्री काय घडलं ते सांगायला सांगितलं. तिची कहाणी ऐकल्याबरोबर तो प्रथमच मोकळया आवाजात हसला अन् त्याची बायकोही इडापिडा टळली म्हणून समाधानी झाली.

"मी मात्र त्या मांत्रिकाच्या मढयावर साडेचारशे रुपये फुक्कट टाकले." पांडुरंग चडफडत बोलला: पण आता त्याचा काही उपयोग नव्हता.

"ते काळं अन् रक्तासारखं लाल पाणी काढून त्यानं एखाद्या डॉक्टर सारख निदान कसं काय केलं रे ?" अचानक त्यानं मला प्रश्न टाकला. तसा मीही त्याची कथा ऐकल्यानंतर या प्रश्नावर विचार करतच होतो. आणि मला उत्तरही सापडत होतं.

मी त्याला हळद, कुंकू आणि चुन्याची डबी आणायला सांगितली. प्रथम कुंकू त्याच्या हातावर चोळलं. मग हळदीचं पाणी करून त्याची धार हातावर सोडली. तो काय काळया रंगाच पाणी पडू लागलं. मी म्हटलं, "बघ, हळदीची कुंकवावर क्रिया होउन ते काळे पडते. हे झालं भूत लागल्याच निदान." पांडुरंगला हात स्वच्छ धूऊन यायला सांगितलं. मग त्याच्या हाताला हळद चोपडली आणि चुन्याचं पाणी करून, त्याची धार हातावर धरली. तो हात धुतांना लालभडक रक्ताच्या रंगाचं पाणी पडत होतं. मी म्हटलं, बघ. चुना अल्क



पदार्थ आहे आणि हळद रसायनातील अनुमापनात दर्शक म्हणून काम करते. हळद अल्कली पदार्थावर टाकल्याबरोबर रंगात बदल होऊन लाल रंगाचं द्रावण तयार होतं. हे दहावीच्या विद्यार्थ्यांना रसायनशास्त्रात शिकवतात. तूही हे शिकलायस पण फक्त पुस्तकी ज्ञान ! आता हे झालं हडळ निघून गेल्याचं निदान. पण खरी हडळ तर ही प्रिया, तुझ्या समोरच उभी आहे." यावर आम्ही सगळे मनसोक्त हसलो.

पण खुळ्या समजुतीच्या पगड्यामुळे मांत्रिकानं पांडुरंगसारख्या गरीब माणसाला हातोहात साडेचारशे रुपयांना गंडवलं होतं. हे कर्ज फेडण्यासाठी बिचाऱ्याला नंतर सहा महिने जादा काम करावं लागलं होतं.

# नाचणारी भुते अणि पेटणारे जंगल

ही घटना आहे कोकणातील. कोकण डोंगर-दऱ्या आणि जंगलं ह्या बाबतीत प्रसिध्दच आहे. ह्या कोकणातील जंगलात आग्यावेताळ, ब्रम्हसमंध, मानकाप्या अशी अनेक भुते वास्तव्य करून असल्याचे दाखले दिले जातात. एकंदरीत कोकणातील जंगलात केव्हाही एकटया दुकटयाने फिरणं तसं धोकादायकच मानलं जातं.

या कोकणात मी 'जंगल बचाव' समितीतर्फे जंगलांची पाहणी करण्यासाठी गेलो होतो. हा आडवाच्याआडवा सहयाद्री कोकणभर पसरलेला. एका बाजूला उंचच्याउंच शिखरं तर दुसऱ्या बाजूला खळाळणारा समुद्र ! दहा वर्षापूर्वी सहज म्हणून मारलेल्या कोकणफेरीच्या वेळच्या कोकणाची ह्यावेळी मात्र सगळीच रया गेलेली होती. एखाद्या मेंढीच्या अंगावरील लोकर काढल्यावर ती जशी बोडकी नि विद्रूप दिसते, तशी हयावेळी कोकणात त्या डोंगरांची स्थिती झाली होती. आता कोकणात जी काही थोडीफार गर्द झाडी दिसते, ती त्या डोंगरात वास्तव्य करणाऱ्या देवांमुळेच. हया भागाला देवराया म्हणतात. त्यामुळे कधी कधी असं वाटतं की निदान देव या संकल्पनेचा जंगल वाचवण्यासाठी जरी उपयोग होत असेल; तरी या संकल्पनेला पर्यावरणाशी जोडून घ्यायला हरकत नसावी. पण त्या पुढे जाऊन या संकल्पनेचा उपयोग कर्मकांडासाठी मात्र होऊ नये. नाहीतर आधुनिक विज्ञानाच्या नावाखाली आपण अंधश्रध्दाच वाढवू. असो !

सध्याची कोकणातील जंगलं तोडीची समस्या यामुळे बिकट होत चालल्याची लक्षणं दिसत होती. लाकडाची गरज सर्वांनाच असते. शहरातील फर्निचरपासून ते खेडयातील जळाऊ इंधनापर्यंत लाकूड सर्वत्र लागते. त्यामुळे झाडे तोडावी लागतात हेही खरे. पण यासाठी पुन्हा पुन्हा झाडांची लागवड करणेही आवश्यक असते. आपण मात्र तात्कालिक फायद्याकडे नजर ठेवून आणि भविष्याचा विचार न करताच नुसतीच जंगलतोड करीत राहतो. मग त्याचा व्हायचा तोच परिणाम होतो. पाऊस कमी होतो. आणि पडला तर असा पडतो की ज्यामुळे डोंगरच्या डोंगर खचून जातात. भरमसाठ माती नद्यांमध्ये गाळरूपाने वाहून आणली जाते. धरणांची पाणी साठवून ठेवण्याची क्षमता



कमी होते.

असा विचार करीत आम्ही दौरा करत होतो. त्यादिवशी आमचा तरकर्ली या खेडयात मुक्काम होता. कोकणात आजही जी काही ठिकाणं खरोखरच्या नैसर्गिक जंगलांनी वेढलेली आहेत; त्यात तरकर्लीचं जंगल येतं. येथील गावकऱ्यांशी गप्पा मारताना आम्हाला त्यांनी एक अद्‌भुत घटना हया जंगलात घडत असल्याची माहिती दिली.

त्या जंगलात म्हणे दर अमावस्येला भुते नाचतात. नाचता नाचता मोठा जाळ करतात आणि सारं जंगल पेटून उठतं. मोठमोठे आवाज, खिंकाळणें ऐकू येतं. अक्राळ विक्राळ रूप घेतलेलं ज्वालांचं तांडव दिसतं. दर अमावास्येला आमच्या गावाचा मांत्रिक एक पूजाविधी करतो. त्यामुळे ती भुते अजूनतरी गावापर्यंत पोहोचली नव्हती. पण गावातील एकटादुकटा माणूस त्या जंगलात गेला की, तो परत येताना झपाटल्यागत येतो. काही माणसे तर एकदा गेलेली परत आलीच नाहीत. भुतांनी त्यांचा बळी घेतला असं मांत्रिक आम्हाला सांगतो. दर अमावास्येला त्या भुतांची जत्रा भरते. त्यावेळेस त्यांना एका नरबळीची आवश्यकता असते. ज्या वेळी नरबळी मिळत नाही, त्या रात्री त्यांचा खेळ आणखी भयानक स्वरूप धारण करतो. अख्या गावाला रात्री डोळयाला डोळा लागू देत नाहीत ती भुते. म्हणून तुम्ही काही त्या जंगलात जाऊ नका. आमच्या गावात आलेल्या पाहुण्यांचा बळी नको जायला त्यात.

आम्हांला त्यांची कथा ऐकून मनापासून हसायला येत होतं. कारण भुताखेतांवर आमच्यापैकी कुणाचाच विश्वास नव्हता. पण चेहऱ्यावर तसं काही न दाखवता मी विचारलं, हे सर्व केव्हापासून घडायला लागलं ?"

"ते असं हाय बघा..." अशी सुरुवात करून एक गावकरी बोलायला लागला. तेवढयात त्याला तोडून त्यांच्यातला एक तरुण मुलगा म्हणाला,'गेल्या वर्षीच या जंगलातला एक पट्टा सरकारनं एका मोठया कंत्राटदाराला लाकूडतोडीसाठी दिला. तेथे काम करण्यासाठी दूरदूरच्या गावाहून लोक आपला कुटुंबकबिला घेऊन मजुरीसाठी आले. आमच्या गावातील भिमरावाला त्यांनी मुकादम म्हणून घेतलं. त्याच्या बरोबर आमच्या गावातील काही भूमिहीन शेतमजूरही कामाला जायला लागले."

"आणि महिन्याभरातच हया घटना घडू लागल्या. सुरुवातीला आम्हाला वाटलं वणवा लागला असेल. म्हणून भिमराव आणि गावचे इतर काहीजण तो विझवायला त्या रात्रीच जंगलात जायला निघाले.जसजसे ते वणव्याच्या जवळ जाऊ लागले, तशी त्यांना काहीतरी विचित्र हालचाल जाणवू लागली. पेटणारी झाडे जागेवरून हलताहेत. नाचताहेत असं त्यांनी पाहिलं. भिमरावाची तर

बोबडीच वळली. भू..भू..भुत म्हणत तो मागे परतायला लागला. पण त्याच्या बरोबर त्यांनी आणखी जवळ जाऊन नीट पाहू; असं त्याला सांगितलं. तेव्हा तो म्हणाला 'तुम्ही पुढे व्हा, मी इथेच झाडाखाली थांबतो.' त्याला सोडून गावकरी थोडे पुढे गेले नसतील तोच त्याच्यापैकी एकाला अचानकपणे एक झाड मागून नाचत येताना दिसलं.

"एक निर्जीव झाड अन् तेही भयानक आवाज करत जवळ येतंय... जिवंत झाल्यासारखं वागतंय हे पाहून गावकरी भिमरावाजवळ पळत गेले. पण भिमराव तेथे दिसला नाही. ते झाड जवळ येतच होतं. तेवढयात त्यांच्यापैकी एकाला त्या झाडाच्यामागून एक उलटया पायाची, धड नसलेली आकृती दिसली. आणि भुत..भुत म्हणत ते सगळे पळत सुटले. काही अंतर गेल्यावर वाटेत त्यांना भिमराव पडलेला दिसला. पाहिलं तर तो बेशुध्द पडला होता. त्याच्या अंगात सडकून ताप भरला होता. कसंबसं त्या घाबरलेल्या गावकऱ्यांनी त्याला उचललं. आणि गावात आले. भिमरावला शुध्दीवर यायला जवळजवळ दोन दिवस लागले. पण आल्यापासून तो झपाटल्यागतच करत होता. शेवटी मांत्रिकानं त्याच भुत उतरवलं. पण तो आता जंगलाच्या दिशेने पाहायलाही घाबरतो."

ही घटना घडली त्याच्या दुसऱ्या दिवशी किती जंगल पेटलं ते पहायला काही धीट गावकरी वणव्याच्या जागी घोळक्यानं गेले. ते पहातात तो त्यांना एकही झाड पेटलेलं दिसलं नाही. पलीकडे कंत्राटदाराचं जंगलतोडीचं काम चालू होतं. तिथे जाऊन रात्रीची घटना त्या लोकांना सांगितली तर त्यांनी असं काही पाहिल्याचं किंवा ऐकल्याचं आठवत नाही असं सांगितलं मग गावकऱ्यांनी भिमरावाला एका भुतानं कसं झपाटलं ते सांगितलं आणि आता काही दिवस तरी तो बरा होईपर्यंत कामावर येणार नाही हेही सांगितलं.

तेव्हापासून आमच्यापैकी जंगलात कुणी एकटयानं जायच धाडस करत नाही. वणवा पेटलेला दिसला अन् झाडं जळली नाहीत म्हणजे नक्कीच भुतांनी तेथे वस्ती केलीय; हे गृहीत धरलं होतं. तेथे चाललेल्या लाकूडतोडीच्या कामावर जाणारे दिवसाही एकत्र जातात तेव्हा तुम्ही त्या जंगलात गेलात तरी एकटयानं जाऊ नका. अन् रात्री त्या दिशेला बघू सुध्दा नका."एवढं बोलून तो तरुण डोळ्यांसमोरुन घटना सरकत असल्यागत चेहरा करून बसला. आणखी थोडावेळ गप्पा चालल्या. मग गावकरी घरी गेले. आम्ही झोपायच्या तयारीला लागलो. झोपता झोपता आमच्यातला सतीश म्हणाला,"काय रे खरंच हया जंगलात भुतं असतील ? एकदा बघायला मिळाली तर काय बरं होईल."

"हे बघ सतीश," मी म्हटले," आपल्याला हे माहीत आहे की, ज्या गोष्टी



विज्ञानाच्या कसोटीवर घासून आणि पारखून सिध्द होत नाहीत, त्या निव्वळ कल्पना असतात. गेल्या हजारो वर्षानंतरही मानवाला जीवनआधी आणि नंतरचं काही माहीत नाही. एवढंच नव्हे, तर या जीवनातही पुढे काय होणार आहे, त्याची त्याला माहिती नसते. अशा अशाश्वत जीवनाची त्याला भीती वाटत असते. अशावेळी तो मृत झाला की, त्याच्या अतृप्त इच्छा, आकांक्षा व हे जीवन न सोडण्याचा मोह इ. गोष्टीमुळे भुताचा जन्म होतो. लहानपणापासून असेच संस्कार आपल्यावर केले जातात. मग अतृप्त आत्मा, भटकणारा समंध कुणाच्यातरी शरीरात प्रवेश करून आपल्या अतृप्त राहिलेल्या इच्छा पूर्ण करतो, अशा कथा प्रसृत होतात. एकातून अनेक दंतकथा निर्माण होतात. त्यांचाच जबरदस्त पगडा आपल्या मनावर असतो."

"रात्रीच्या वेळी एकट्याने बाहेर पडल्यावर ही अनामिक भीती आपल्या मनाची पकड घेते. अशावेळी झाडाच्या पानांची सळसळही आपणास घाबरविते. उगीचच झाडाच्या सावलीवरून नको ते भास आपल्या मनात तयार होतात. भीषण आकृत्या दिसायला लागतात. कधी - कधी भर दुपारी निस्तब्ध वातावरणातही ह्या भासांचा खेळ सुरू होतो. संवेदनाशील हळवी माणसे ह्या भासांनाच खरं समजून भीतीची शिकार होतात. त्यांच्या मेंदूवर एवढा जबरदस्त परिणाम होतो की, ती व्यक्ती असंबध्द बडबडू लागते. केव्हातरी ऐकलेल्या भुतांच्या गोष्टीतील वा आजूबाजूच्या परिसरातील घडलेल्या अपघाती मृत्यूमुळे, त्यांच्या डोळ्यासमोर भुते फेर धरून नाचू लागतात. तो त्यांची नावे घेऊन बडबडू लागतो. आणि लोकांना आणखी एक भुताची कहाणी मिळते. अशा कहाण्या वाढत जातात. त्याचा परिणाम पिढ्या न् पिढ्या चालू असतो."

"खरं तर मानसिक धक्क्यामुळे त्यांच्या मनावर आघात झालेला असतो. ती मनोरुग्ण असतात. कधी कधी त्यांनी केलेल्या अत्याचारी गोष्टींमुळे त्यांचं मन त्यांना सतत खात असतं. त्याचा मेंदूवर पडलेला ताण ज्यावेळेस मेंदू सहन करू शकत नाही, तेव्हा विकृतीचा हा कोंडमारा बाहेर पडतो. आणि आपण म्हणतो की त्याला बाहेरची बाधा झाली. काही माणसं एकलकोंडी असतात. ती सतत कुढत राहतात. जेव्हा हे कुढणं परिसीमा गाठतं, तेव्हासुद्धा मनातील मळमळ विकृत स्वरूपात बाहेर पडते. पुन्हा एका नव्या भुताटकीचा जन्म होतो."

"हे सगळे आपल्याच मनाचे खेळ आहेत. ही भुतं जर गाडायची असतील, तर आपण सर्वांनी विज्ञानाची कास धरली पाहिजे. विज्ञाननिष्ठ दृष्टिकोन स्वीकारला पाहिजे. त्यासाठी सर्वसामान्य लोकांमध्ये जाऊन, त्यांच्यात मिसळून प्रचार करायला हवा. विज्ञानाच्या नुसत्या सोयीच दाखवून हे काम भागणार नाही, तर नवा समाज निर्माण करावयास हवा. त्यांची मनं खंबीर, तर्कनिष्ठ

करावी लागतील. अर्थात् या गोष्टी एका झटक्यात होतील असे नाही. त्याला कित्येक पिढ्या जाव्या लागतील. पण, कुठूनतरी सुरुवात व्हायला हवी. त्यासाठी आपल्यालाच पायाचा दगड होणं भाग आहे."

"फार मोठं बौध्दिकच घेतलंस बाबा तू माझं. आता इथेच बघना, हे सगळं गाव भुतांच्या खेळांनी त्रस्त झालंय. आपण या मागचं रहस्य शोधायला काय हरकत आहे. अनायसे संधी चालून आली आहे. याचा फायदा का घेऊ नये ?" सतीश विचार करत म्हणाला.

"ठीक आहे, आपण उद्याच जाऊ. अरे हो, उद्या नेमकी अमावास्याही आहे. म्हणजे आपल्याला भुतांचा नाचही बघायला मिळेल. चल, ठरलं तर मग." असं म्हणून आम्ही झोपी गेलो.

दुसऱ्या दिवशी सकाळी उठल्यानंतर, गावात फेरी मारत असतान्रा, गावातील काही तरुणांना आम्ही आमचा रात्रीचा प्लान सांगितला. त्यांनाही यायला सांगितलं. पण फक्त दोनच मुलं तयार झाली. मग आम्ही चौघांनी जर रात्री भुत दिसलंच तर त्याला कसं पकडायचं याचे डावपेच आखले.

संध्याकाळपर्यंत साऱ्या गावात बातमी पसरली होती. आम्हाला अशा आत्मघातकी विचारापासून परावृत्त करायला गावातील काही वयस्क मंडळी आली. मी त्यांना भुताविषयीच्या माझ्या कल्पना स्पष्ट करून समजावून द्यायचा प्रयत्न केला. अर्थात् ते सगळे त्यांच्या समजण्यापलीकडचे होतं. त्यामुळे त्यांना आमचं वागणं मूर्खपणाचं वाटत होते. तेवढ्यात आमावस्येला फेरी मारणारा मांत्रिकही तेथे आला. तो आल्यावर त्याला गावकऱ्यांनी आम्हाला समजावण्यास सांगितलं. आम्ही जाण्याचा निश्चय केलाच होता. आम्ही ऐकत नाही असे पाहून तो मांत्रिक काही भीतीदायक गोष्टी सांगू लागला. पण आमच्यावर काही परिणाम झाला नाही. गावातली तयार झालेली मुलं मात्र जरा चुळबूळ करू लागली होती. मला त्यांचा आत्मविश्वास टिकवणं महत्वाचं वाटत होतं. म्हणून आम्ही ताबडतोब बाहेर पडायचा निर्णय घेतला. आणखी त्यांच्या क नावर काहींबाही पडायला नको.

आम्ही चौघे बाहेर पडलो. आमच्याकडे एक कमांडर टॉर्च आणि जाड दोर इतकीचं सामुग्री होती. तिकडे गावकऱ्यांनी मांत्रिकाला, आम्हाला भुतांनी काही त्रास देऊ नये म्हणून पूजाविधी करायला सांगितला.

जंगलातल्या दिशेनं निघालो तेव्हा रात्र होत आली होती. मी त्या गावच्या मुलांना भुतांचं मानसशास्त्र समजावून सांगण्याचा प्रयत्न करत होतो. समजा भुत समोर आलंच तर कुणी कसं काय करायचं ते सांगितलं. आता अंधार वाढायला लागला होता. जंगलही दाट व्हायला लागलं होतं. रातकिड्यांचा



किर्रकिर्र आवाज कानी पडायला लागला. उंच उंच झाडं..... त्यांना लपेटलेल्या वेलीची जाळी..... पानांची सळसळ..... वेलींची सापांप्रमाणे होणारी हालचाल..... मधूनच एखादी वेल पायात अडकून धडपडणं.... हे सर्व रात्रीची गंभीरता वाढवीत होते. त्यात मध्येच पायवाट हरवत होती. कमांडर टॉर्चचा उपयोग करून, अंदाजे दिशा ज्ञानाने आम्ही पुढे सरकत होतो. काट्याकुट्याच्या ओरबडण्यामुळे अन् अंधाऱ्या वाटेमुळे वेग मात्र मंदावला होता. अमावास्येची रात्र आधीच काळोखी, त्यात झाडांच्या गर्दीमुळे चांदणंही दिसत नव्हतं. चांदणं सोडाच पण पाच पावलांवरच दिसणंही कठीण झालं होतं. तरीही वाट काढून आम्ही चाललो होतो.

एवढ्यात सतीशला कसला तरी आवाज आला. तो म्हणाला, काही ऐकलंत का रे? "आम्ही थांबलो अन आवाजाचा कानोसा घेऊ लागलो. त्या निस्तब्धतेत पानांची सळसळ अन् रातकिड्यांचे आवाज यापलीकडे काहीच ऐकू येत नव्हतं. मी म्हटलं, "कदचित तुला भास झाला असेल." पुन्हा आम्ही दबकत - दबकत चालू लागलो. जर समजा असा काही आवाज असेलच तर पायाखालच्या पाचोळ्याच्या आवाजाने कळणार नाही. म्हणून दबकत चालणंच आवश्यक होतं. आणखी काही अंतर गेल्यावर आम्हाला दूर अंतरावर जाळ दिसू लागला. मी म्हटलं, "चला, म्हणजे भुतं दिसायची जागा जवळ आली तर !" आम्ही जाळाच्या जवळ जाऊ लागलो. मी कमांडर टॉर्चचा प्रकाश त्या जाळाच्या दिशेने फेकला. काही क्षणात 'कुंई कुंई कुंई.....क्यां ह्याऽऽऽऽ' अशा विचित्र प्रकारचं केकाटणं ऐकू आलं. वातावरणाचा परिणाम म्हणून आमच्या सर्वाच्या अंगावर भीतीचे शहारे आले होते. पण घाबरलो मात्र नव्हतो.

आम्ही जाळाच्या जवळ आलो. झाडं नाचताना दिसत होती. त्या जळत्या झाडांना शतजिव्हा फुटून ती विक्षिप्त आवाज काढत होती. त्या वेड्यावाकड्या नर्तनामुळे अन् भयंकर आवाजामुळे वातावरणात भेसूरता आली होती. क्षणार्धात तो जाळ आमच्या पासून लांब जायला लागला. आम्ही पुन्हा चालायला लागलो. जाळ जवळ यायला लागला. आम्ही काही अंतरापर्यंत जवळ गेलो अन् तो जाळ पुन्हा लांब गेला. असं दोन - तीनदा घडलं. बरोबर आलेला तरुण म्हणाला, "ते बहुतेक आपल्याला त्यांच्या रिंगणात नेताहेत. एकदा का आपण त्यांच्या रिंगणात शिरलो की, मग, ते आपल्याला घेरतील." मी त्याचा खांदा दाबत, धीर देत म्हणालो, "पाहू या तर खरं काय होतंय ते ! तू मात्र घाबरू नकोस."

आम्ही मागे, जाळ पुढे असं काही वेळ घडत राहिलं. नंतर - नंतर तर त्याची भेसूरता खूपच वाढू लागली. एका ठिकाणी तर त्या जळत्या झाडातील एक

तुकडा सतीशच्या अंगावर येऊन कोसळणार होता, पण त्याच्या प्रसंगावधानामुळे तो बाजूला पडला.

आम्ही बधत नाही, हे भुतांच्या लक्षात आल्यावर त्यांनी आम्हाला घाबरवून सोडण्यासाठी अनेक प्रकार सुरू केले. मला मागे कसला तरी आवाज झाल्यासारखा वाटला. म्हणून मी मागे वळून पाहिले. तो काय, एक वाळणारं झाड आमच्या मागे जवळजवळ दोनशे पावलांवर नाचत होत. त्या दिशेने 'हा हा...हु हु' असे आवाज येत होते. मी सतीशला म्हटलं, "सतीश, तू ह्या ठिकाणीच उभा रहा. आणि त्या झाडाला हुलकावणी देत त्याला दिसेल असा इकडे तिकडे पळ. तेवढ्यात आम्ही मागच्या बाजूने येऊन त्या भुताला पकडतो. आता विचार करायची वेळ नाहीच."

मी ताबडतोब सतीशला एकटा सोडून त्या दोघांना माझ्याबरोबर घेऊन झाडा मागे लपलो. तो जाळ सतीशच्या जवळ सरकू लागला होता. आम्ही अलगदपणे चालत त्याच्या पिछाडीला गेलो. जाळ आणि त्यातून निघणारा भयाण आवाज सतीशपासून पंचवीस पावलांवर आला नसेल तोच मागून मी त्या झाडावर जोराने जाऊन धडकलो. माझ्या अनपेक्षित धक्क्यामुळे ते जळतं झाड घेऊन नाचणारा माणूस धाडकन् जमिनीवर आडवा झाला. ते झाड लांब उडाले. आम्ही तिघेही त्याला मारू लागलो. तेवढ्यात सतीशही तेथे आला.

आम्ही त्याला मारत असताना तो गयावया करत होता. पण आम्ही त्याच्याकडे लक्षच दिले नाही. आमचे हात दुखल्यानंतर आम्ही त्याच्या मुसक्या बांधून गावाच्या दिशेनं परत फिरलो. वेग मुद्दामच वाढवला होता. शक्यतो लवकरात लवकर त्याच्या इतर साथीदारांपासून दूर जायचं होते. नाहीतर त्याच्या इतर अनेक साथीदारांनी आमच्यावर हल्ला केला असता. इतक्या माणसांपुढे आमचा टिकाव लागणं शक्यच नव्हतं. शेवटी आम्ही त्यांच्यापासून सुरक्षित अंतरापर्यंत लांब येण्यात यश मिळवल्यावर आणि जरा मोकळ्या जागेत आल्यावर दम खाण्यासाठी थांबलो.

त्या माणसाच्या तोंडातील बोळा काढून, त्याच्यावर टॉर्चचा झोत टाकला प्रकाशात स्वच्छपणे त्याचा चेहरा दिसल्याबरोबर, आमच्या बरोबरचा तरुण ओरडलाच, "अरे, हा तर सुभान्या परदेशी. कातकऱ्यांचा मुखिया" मी चक्रावलो अन् त्याला विचारलं, "तू कसं काय ओळखतोस याला ?" तो तरुण म्हणाला, "मी ज्या ठिकाणी लाकूडतोडीच्या कामावर मजुरीला जातो ना; तेथे हा सुद्धा त्याच्या माणसांबरोबर कामाला येतो. ते जंगलातच राहतात."

मी त्या सुभान्याला दरडावून विचारलं, "काय रे, गेलं वर्षभर या गावकऱ्यांना भुतं बनून का छळताय ?"



तो काहीच बोलेना. आता मारणार नाही. पण सगळं खरं खरं सांगितलं पाहिजेस असं त्याला आश्वासन दिल्यावर मात्र तो धडधडा बोलू लागला.

"साहेब, आम्ही गरीब माणसं. पोटाच्यासाठी दूरदूर मजुरीसाठी भटकत असतो. आमच्या बायकामाणसांनाही भटकावं लागतं. तसंच गेल्या वर्षी आम्ही येथे मजुरीसाठी आलो.

यांच्याच गावचा भिमराव आमचा मुकादम होता. एकदम वंगाळ माणूस.... हलकट आणि नीच त्यानं आम्ही कामावर गेलो की, आमच्या बायांना नासवायचा डाव आखला होता. कंत्राटदाराला त्याच्याविरुध्द बोलूनही चालण्यासारखं नव्हतं. कारण आमचं पोट तोडून टाकायची भीती घातली होती भिमरावनं. ही मजुरी गेली तर जगायचं कसं आम्ही गरिबांनी ?

एकदा तर आम्ही कामावर गेलो असतांना त्यानं माझ्या बायकोच्या अंगावर हातदेखील टाकला. कशीबशी ती निसटली त्याच्या हातून. आम्हाला काय आब्रू नाय ? ह्या त्रासाला कंटाळून मी ही युक्ती काढली. आमच्या माणसांना एकत्र घेऊन भूतचाराचा खेळ करायला लागलो. एकदा भिमराव आमच्या तावडीत सापडला. त्याला असा घुमवला की तो पुन्हा कामावर आलाच नाही. आमचं काम झालं होतं. पण पुन्हा त्याने इकडे फिरकू नये म्हणून आम्हांला हे नाटक सतत करणं भाग होतं साहेब, तुमच्या पाया पडतो. पण मला सोडा." असं म्हणून तो रडायला लागला.

हे ऐकून आम्ही सगळेच एकदम सुन्न झालो.

# करणी

प्रशांत धापा टाकीतच माझ्याकडे आला. दम न खाताच तो म्हणाला, "विश्वास, मला तुझ्याकडून मदत हवीय. तू ताबडतोब आत्ताच्या आत्ता माझ्याकडे चल." त्याला शांत करीत मी म्हटलं, "अरे, पण झालं तरी काय? तू शांत हो अन् मग सांग. तोपर्यंत मी कपडे करून निघतोच."

"अरे, आज आमच्याकडे एक साधू आला होता. त्यानं माझ्या बहिणीवर कुणीतरी नातेवाईकाने केलेली करणी उतरवली. त्या स्त्रीनं शीलाला खाण्यातून विष दिलं होतं म्हणे. ते विष त्यानं दुधाच्या भांड्यात उतरवलं. त्यासाठी आज आमच्याकडे सर्पपूजा करण्यात आली. बघता - बघता दूध काळं निळं झालं. आम्ही सगळेच ह्या चमत्कारावर भारावून गेलो. पण मला काही ते पटलं नाही म्हणून त्याचा छडा लावण्यासाठी तुझी मदत घ्यायला आलोय. ते दुधाचं भांडं मी माझ्या कपाटात कुलूप लावून ठेवलंय." मी म्हणालो, "पण मला असं सांग, तुझ्या बहिणीवर शीलावर करणी केलीय हे निदान त्या साधूनं कशावरून केलं. तिला असं झालंय तरी काय चांगली हुशार मुलगी आहे ती."

माझ्या या बोलण्यावर प्रशांत काही क्षण गप्प राहिला शून्यात नजर लावून त्याने शीलाची हकीकत सांगायला सुरवात केली.

दोन वर्षापूर्वीची गोष्ट आहे बघ. आम्ही मध्यप्रदेशातील भोपाळ शहरात राहत होतो. मी कॉलेजच्या शेवटच्या वर्षाला होतो. शीला दहावी झाल्यानंतर घरीच होती. पण आईनं 'काय करायचं पोरीच्या जातीला जास्त शिकून? आता तुझ्या लग्नाचं बघायला हवं. नाहीतरी लग्न झाल्यावर चूल आणि मूल यापलीकडे पोरींना काही करायची आवश्यकता नसतेच मुळी! तेव्हा आता तुझं शिक्षण बस.' असं म्हणून तिला घरीच ठेवली.

वडिलांची बदली या गावात झाली होती. पण माझी परीक्षा संपण्याची ते वाट पहात होते. म्हणजे मग सगळे एकदमच इकडे रहायला येऊ शकणार होतो. सहा महिन्यापूर्वी सुरवातीला तिचं प्रचंड डोके दुखू लागले. इतकी की तो ठणका सहन होईना. ती सतत कपाळावर बुक्के मारून घेऊ लागली. डोकेदुखी बरी होतेय तोच तिचं पेपर वाचण्याचं वेड सुरू झालं. ती डोळ्या समोर नेहमी पेपर ठेवू लागली. पण वाचण्यात प्रगती मात्र शून्य होती. पेपर समोर ठेवून ती



त्याच्याकडे शून्यातून पाहायची. कुठंतरी तंद्रीत हरवल्या सारखी राहायची. दिवसभर एक पान तिच्या डोळ्यासमोर असायचं.तिला जेवायची सुध्दा शुध्द नसे. तिचं जेवणही कमी होत चाललं होतं. जास्त आग्रह केला अन् खायला लावलं तर ओकून टाकायची.

अनेक डॉक्टरी उपाय करूनही काही गुण आला नाही. तेव्हा वडिलांच्या ऑफिसमधील एक क्लार्क सावंत याने त्यांना एका साधूविषयी सांगितले. तो साधू म्हणे कोणताही असाध्य रोग बरा करतो. हरवलेली माणसे त्याच्या दिव्य दृष्टीने शोधून काढतो. एवढंच नाही; तर मुक्या बहिऱ्यांनाही बोलायला व ऐकायला लावतो.

वडिलांनी त्या साधूला बोलावायचं ठरवलं, तेव्हा मी विरोध केला. साधूबाबाच्या नादी लागण्या- ऐवजी आपण एखाद्या चांगल्या मानसोपचार - तज्ञाकडे शीलाला घेऊन जाऊ असं मी सुचवलं. तर आईवडिलांनी 'माझ्या मुलीला काय वेड लागलंय तिकडे न्यायला.' असं म्हणून माझं म्हणणं धुडकावून लावलं. हतबल होऊन जे होईल ते पाहण्याव्यतिरिक्त माझ्या हातात काहीच राहिलं नव्हतं.शेवटी त्यांनी सावंताच्या मदतीने त्या साधूला आणायचं ठरवलं.

आठ दिवसांपूर्वी तो साधू आमच्याकडे आला. आईने त्याच्यासाठी बसायला खास मृगजिन आणलं होतं. त्यावर तो बसला. त्याचं रूप मात्र एकंदरीत प्रभावी होतं. रुंद कपाळ... त्यावर चंदनी पट्टे.... भरगच्च पांढरी दाढी.... डोक्यावर केसांचा बांधलेला बुचडा इतके तेजस्वी डोळे की त्याच्याकडे नजर देणंही मुष्कील होतं.

त्याने मृगजिनावर पद्मासन घालून बैठक मारली. सर्वांनी त्याला नमस्कार केला. नाईलाजाने मलाही नमस्कार करावा लागला. आईने त्याला बदामपिस्ते घातलेलं केशरमिश्रित दूध आणून दिलं. नंतर बाबांनी शीलाला होणाऱ्या त्रासाची साधूला माहिती दिली. शीलाला त्याच्यासमोर आणण्यात आलं. त्यानं तिला त्याच्यासमोर बसण्याची खूण केली व एकटक भेदक नजरेनं तिच्याकडे पाहू लागला. त्याबरोबर शीलाने ध्यानस्थ झाल्यासारखे डोळे मिटले. साधू तिच्याकडे एकटक पहातच होता. काही मिनिटांनी त्याने तिच्या डोळ्यांवरून हात फिरवला. तिने डोळे उघडले. तिचा चेहरा त्यावेळी थोडासा खुलल्यासारखा वाटला.

साधूने आता बोलायला सुरुवात केली, "बालकांनो, आपण क्षुद्र माणसे हेवेदावे करून परस्परांना त्रास देत असतो. तिच्याकडे आहे अन् माझ्याकडे नाही, म्हणून जळफळ करत असतो. यातूनच मग असे प्रश्न उद्भवतात."

"शीलाला, तुमच्या जवळच्या कोणत्यातरी नातेवाईक स्त्रीनं जेवणातून विष दिलंय. त्याचा परिणाम म्हणून ही असं वागतेय. हे विष उतरवायला 'सर्पपूजा' करावी लागेल. मगच ही बरी होईल."

त्यानंतर त्याने शीलाला आत जायला सांगितलं आणि बाबांशी बोलणी करायला लागला. त्यातून सर्पपूजेची तारीख निश्चित करण्यात आली. त्यासाठी लागणाऱ्या सामुग्रीची एक भली मोठी यादी त्याने बाबांसमोर ठेवली. आई बाबा सर्पपूजेच्या तयारीला लागले.

तयारी करत असतानाच त्यांनी चर्चा करायला सुरुवात केली की, आपल्या कोणत्या नातेवाइकाने हे नीच कर्म केलं असेल, कोण आपल्यावर जळतंय, यावर ते तर्क करू लागले. मग गेल्या काही महिन्यात आपण कुणाकुणाकडे जेवायला गेलो होतो, याची यादी काढली. त्यातील बऱ्याच शक्यता नाकारता नाकारता ते शेवटी एका अशा नातेवाइकाच्या कुटुंबावर येऊन ठेपले की, ज्यांच्याविषयी त्यांना संशय वाटत होता. गेल्याच महिन्यात त्यांच्याकडे आम्ही जेवायला गेलो होतो.

आई ठामपणे म्हणाली, "ही सटवी, माझी आतेबहीणच. तिनेच माझ्या लाडक्या शीलेवर करणी केलीय. कारण माझ्या प्रशांत एवढाच तिचा मुलगा शिकलेला असूनही त्याला नोकरी नाहीय. अन् प्रशांतला मात्र ऑफिसरची जागा मिळालीय म्हणूनच ती जळत असेल." आईवडिलांनी ताबडतोब निर्णय घेऊन टाकला की, यापुढे यांच्याशी संबंध ठेवायचा नाही.

मला मात्र राहून राहून ही साधूची भंकसगिरी वाटत होती. उगाच बिचारी मावशी या खोड्यात अपराधी ठरली होती. पण, माझा काहीच इलाज नव्हता.

आज सकाळीच तो साधू आमच्याकडे आला. आज त्याच्या खांद्यावर भगवी झोळी होती. बाबांनी पूजेची तयारी केलेल्या खोलीत त्याला नेलं. तिथे तो पश्चिमेकडच्या भिंतीसमोर तोंड करून बसला. समोर केळीच्या पानावर कालवलेला भात ठेवलेला होता. शेजारीच तांब्याच्या तांब्यात नारळ ठेवला होता. त्या तांब्यासमोर एक निरंजन लावण्यात आलं होतं. एका बाजूला एका ताटात हळद कुंकू, अबीर, गुलाल, कापूरवडी इ. पूजेचं साहित्य ठेवण्यात आलं होतं. तर दुसऱ्या बाजूला केळीच्या पानावर तांदूळ, कुरमुरे, इ. वस्तू होत्या त्या साधूच्या समोरच हाताशी लागेल एवढ्या अंतरावर मधोमध दुधाचं अर्धवट भरलेलं मातीचं भांडं ठेवलं होतं.

साधूनं सगळीकडे एक नजर टाकली. आपल्या झोळीतून एक रामवेलीचं सुकलेलं सापासारखं दिसणारं खोड बाहेर काढलं. अन् दुधाच्या भांड्यांला टेकवून ठेवलं. शीलाला समोरच्या पाटावर बसवलं आणि मंत्रपठण चालू होतं.



आई बाबा अगदी भक्तिभावाने आणि कुतूहलाने तो विधी पाहत होते.

त्यानंतर त्याने ताम्हनात निखारे फुलवले. त्यावर सुगंधी धुपाची पूड शिंपडली. ते ताम्हन हातात घेऊन धुपाचा धूर खोलीभर पसरवला. पुन्हा एकदा निखारे फुलवून त्यांवर धुपाची आणखी पूड शिंपडली. आता हा धूर त्याने शीला भोवती फिरवला. सारी खोली धुपाच्या वासाने दरवळून निघाली. त्या शांत अणि पवित्र वातावरणात त्या साधूचा धीरगंभीर आवाज अंतराळातून आल्यासारखा वाटत होता. जणू काही आकाशवाणीच होत होती.

त्याने मग एक लांब दोरा हातात घेतला. त्याचं एक टोक दुधात बुडवलं आणि दुसरं टोक शीलाच्या तोंडात दिलं. तिला ते टोक सतत चावत रहायला सांगितलं. त्याच्या मंत्रोच्चारांचा वेग आता वाढला होता. खोली धुपाच्या दाट धूराने दाटली होती. साधूने पोतडीतून फुले काढली. त्यातील थोडी फुले शीलाच्या डोक्यावर शिंपडली. उरलेल्या फुलांतील एकेक फूल तो समोर मांडलेल्या वस्तूंवर ठेवत गेला. पोतडीतून त्याने आणखी फुले काढली. नारळावर शिंपडली व उरलेली फुले दुधाच्या भांड्यांत टाकली.

त्यानंतर त्याने ते रानवेलीचं सर्पाकृती खोड उचललं नि शीलाच्या डोक्यावरून फिरवून दुधात बुडवून ती क्रिया दोन - तीनदा केली.हे घडत असतानाच दूध हळूहळू निळं होऊ लागलं होतं. त्याचा प्रथम फिकट निळा व नंतर गडद निळा रंग झाला. थोड्या वेळाने हा विधी आटोपल्याचं साधूने जाहीर केलं. आणि शीलाच्या शरीरातलं सगळं विष आता बाहेर पडलं आहे व ती आता रोग मुक्त झाली आहे असं सांगितलं.

दूध काळं - निळं झालेलं पाहून मलाही त्याच्या या चमत्काराविषयी आश्चर्य वाटलं. आई - बाबा तर त्याच्या पायावर लोटांगणच घेत होती.

शीलाला आता दुसऱ्या खोलीत जाऊन झोपण्यास सांगितलं. आई - बाबांना आता समोर बसण्यास सांगून, आमच्या नोकराला बोलावलं. आमचा रामू तिथेच उभा राहून तो चमत्कार पाहत होता. तो साधूच्या जवळ गेला. अन् पाया पडला.

साधू त्याला म्हणाला,"हे निळं झालेलं विषाच भांडं घे आणि परसदारी जाऊन एका कोपऱ्यातील झाडाखाली खड्डा कर, उजव्या हातातील पाच बोटांवर मावेल इतके शेण गोळा करून ते या भांड्यांत घाल. ते भांडं हातात घेऊन तू सूर्याकडे पाहत, त्या भांड्यांतील दूध खड्ड्यात ओत. मग भांडे त्या खड्ड्यातच फोड. मगच नजर सूर्याच्या दिशेने खाली करून खड्डा बुजव. कळलं ना मी काय सांगतोय ते. जा हे काम नीट कर. नाहीतर पूजा फळणार नाही. दरम्यान मी इथे आता एक विशेष विधी करणार आहे." शेवटचं वाक्य

आईबाबांना उद्देशून म्हणत, त्यांच्या हातात फूलं देऊन मंत्रपठण सुरू केलं.

ते भांडं घेऊन रामू मागच्या दारी गेला. तसा मीही त्याच्या मागोमाग गेलो त्याच्याकडून ते भांडं घेऊन मी माझ्या कपाटात ठेवून त्याला कुलूप घातलं. आणि रामूला हे कुठेही सांगू नये असं बजावलं. साधूनं विचारलं तर तुम्ही सांगितल्याप्रमाणे केलं असं सांगायचं हेही त्याला सांगितलं. आम्ही दोघे पुन्हा साधूच्या खोलीत गेलो.

साधू तो सारा विधी आटोपून, तेथील मांडलेले पदार्थ गोळा करून पोतडीत भरत होता. सारं आवरून झाल्यावर तो जायला निघाला, तेव्हा आईनं त्याला केशर घातलेलं दूध प्यायला दिलं.

बाबा तर एवढे भारावले होते की, ते त्याची भरपूर प्रशंसा करू लागले. शेवटी नम्रतेने ते म्हणाले, "आपण माझ्या पोरीची करणी उतरवलीत. तुमच्या या ऋणातून कसा बरे मुक्त होऊ? ते तर शक्यच नाही. पण, आमच्या समाधानासाठी तुम्ही काही स्वीकारावे." साधू म्हणाला, "मी कधीही काहीच घेत नाही. लोकांची सेवा करून त्यांना त्रासातून मुक्त करणं हे माझं कर्तव्यच आहे. तसा वरून मला आदेश देण्यात आला आहे. पैशांना तर मी कधीच हात लावला नाही. पण तुम्ही काही देणारच म्हणता. मग तुमच मन मी मोडणार नाही. या झोळीत फक्त अकरा रुपये दक्षिणा घाला."

बाबांना वाटलं की, किती हा निस्पृह माणूस आहे. एवढं करूनही फक्त अकराच रुपये दक्षिणा घेतोय. खरं तर याला यापेक्षा जास्त दक्षिणा दिली पाहिजे. आईशी हळू आवाजात आपल मनोगत सांगून बाबांनी एक्कावन रुपये त्याच्या झोळीत टाकले मग तो साधू भरल्या तोंडाने आशीर्वाद देऊन गेला. "साधू गेल्याबरोबर मी तुझ्याकडे आलोय, मला त्याच्या विषयी सुरुवातीपासून शंका आहे. तुझ्या मदतीने त्यांची भोंदूगिरी उघडी पाडून आईबाबांचे डोळे उघडलेच पाहिजेत. तेव्हा आता वेळ न दवडता घरी चल".

मी म्हणालो, "चल, निघूया." बाहेर पडल्यापासून त्याच्या घरी पोहोचेपर्यंत काय घडले असेल याचा मी विचार करत होतो. त्याच्या आईने घरी पोहोचल्यावर आनंदाने स्वागत केले. म्हणाली, "बरं झालं, आज आलास तो. आजच आम्ही एका मोठ्या संकटातून मुक्त झालो आहोत. माझ्या शीलाची करणी उतरली. खरोखरच तो साधू सिध्दपुरूष होता ! हा घे प्रसाद !

प्रसाद खाऊन झाल्यावर प्रशांतने मला त्याच्या खोलीत नेलं. कुलूप काढून ते निळ्या दुधाचं भांड माझ्यासमोर ठेवलं. मी त्याला एक ग्लास आणायला सांगितला. दूध त्या ग्लासात ओतलं. त्याबरोबर रिकाम्या झालेल्या भांड्याच्या तळाशी अर्धवट विरघळलेली निळ्या शाईची गोळी दिसली. ती गोळी उचलून



मी प्रशांतच्या हातात दिली. प्रशांत धावतच आई बाबांना ती गोळी दाखवायला गेला व त्यांना मी ज्या खोलीत होतो तेथे आणले.

सारा प्रकार त्यांच्या लक्षात येताच, त्यांचा संताप अनावर झाला. साधूने आपल्याला हातोहात बनवले म्हणून ते चडफडू लागला. जर का यावेळेस तो साधू त्यांच्या समोर असता तर त्यांनी नक्कीच त्याला बेदम चोपले असते. पण, आता चडफडण्यात काहीच अर्थ नव्हता.

पूजेचा विधी चालू असतांना त्याने फुले वेगवेगळ्या वस्तूंवर ठेवली. तसेच दुधाच्या भांड्यात ही टाकली. त्याचवेळी हातचलाखीने ही गोळीही टाकली होती. चलाखी आपल्या लक्षात आली नाही ह्याबद्दल त्यांना दु:ख झालं. ही चलाखी आपल्या मुलाने व त्याच्या मित्राने शोधून काढावी, आपण मात्र त्याच्यापेक्षा वयाने मोठे असूनही फसवावे हा त्यांना त्यांचा मोठाच अपमान वाटला.

मी शांतपणे त्यांना म्हणालो, "तुम्ही जर भारावून गेला नसता तर तुम्हीही शोधक नजरेनं ही चलाखी पकडू शकला असता. त्याने तुमच्या रामूला भांड्याकडे न पाहता त्यात शेण घालून खड्ड्यात दूध ओतायला सांगितलं आणि भांडं फोडायला सांगितलं यात त्या साधूची चलाखी बाहेर पडू नये याची त्यांन घेतलेली खबरदारीच लक्षात येते. त्यानं कुतूहलाने पाहिलं असतं तरी शेणात ती गोळी लपून गेली असती."

"दुसरं असं की, कोणतंही विष असं महिनोन्महिने कधीच पोटात राहत नाही. विज्ञान तर असं सांगतं की, ज्या विषाचा मज्जातंतूंवर परिणाम होणार असतो, ते विष तासाभरातच आपला प्रभाव दाखवून माणसाचा खेळ खलास करतं. पण ज्या विषाचा काहीच दुष्परिणाम होणार नसतो ते लघवीवाटे बाहेर पडतं. जर ते अपचनीय असेल तर शौचावाटे बाहेर पडतं." अन् अशा या विषबाधेमुळे माणूस कधीच नर्व्हस होत नाही. हे सगळं साधूचं थोतांड होतं.,"

मला जे काही शीला बद्दल प्रशांतने सांगितलंय त्यावरून मला तरी असं वाटतं की, ती मेलेनकोलीया या मानसिक रोगाची शिकार झाली आहे. या रोगात रोगी नर्व्हस होतो. एकलकोंडा होतो. जीवन शून्यवत् वाटू लागतं. आपल्याला काही किंमत नाही. आपली हुशारी कवडीमोल आहे. असं त्या व्यक्तीला वारंवार वाटू लागतं. मग ती स्वत:शीच बडबडू लागते. शून्यात नजर लावून एकटक बघते..... कधी कधी हसण्याचेही झटके तिला येऊ लागतात.''

"माझ्या शीलाला कशाचीच कमतरता नसताना...... सगळं काही व्यवस्थित असताना हा विचित्र रोग का जडावा बरं ?" प्रशांतची आई म्हणाली.

मी म्हणालो, "माझा अधिकार नाही, तुम्हाला काही सांगण्याचा. तुम्ही वयाने

मोठ्या आहात. पण माझा मानसशास्त्राचा अभ्यास झाला आहे, त्यावरून ह्या सगळ्या गोष्टीला दोषी तुम्ही आहात असं वाटतं." माझं हे बोलणं ऐकल्यावर ते जरा चमकलेच. पण मी शांतपणे माझं बोलणं पुढे चालू ठेवलं.

"दहावी नंतर शीलाला शिकायची इच्छा असतानाही, तुम्ही तिला शिकायला बंदी केलीत. स्त्रीला चूल आणि मूल या पलीकडे काही जग असतं यावर तुमचा विश्वासच नाही. तिलाही मन असतं, तीही विचार करू शकते. तिलाही एक व्यक्ती म्हणून जगायची इच्छा असते हे आपण लक्षातच घेत नाही."

"तुम्ही म्हणाला की, आम्ही नाही का असेच संसार केलेत; पण एक लक्षात घ्या तुमच्या काळात आणि आज किती फरक पडलाय. तुमच्याकाळी कोणताही स्त्री घराबाहेर पडतच नव्हती. पण आता मुली शिकायला लागल्याहेत. त्यांना शिक्षणामुळे नवीन विचारांची दिशा मिळतेय. अशावेळी त्यांना भूतकाळातीलच वागणूक दिली तर कसं चालेल ?"

"तुमच्या घरात प्रत्येकजण आपापल्या कामात गुंतलेला ती पहात होती. बाबा ऑफिसात, तुम्ही घरकामात, तर प्रशांत त्याच्या उद्योगात गुंतलेला. प्रशांतला त्याच्या करियरसाठी तुम्ही देत असलेलं प्रोत्साहनही तिला दिसत होतं. नकळत तिने त्याच्याबरोबर तुलना करायला घेतली तर दोष कुणाचा ? तीही त्याच्या एवढी हुशार असताना तीची हुशारी खुंटवली गेली व तिला एकटीला घरात काही कामधंदा न करता लग्नाची वाट पाहत बसवली, तर तिच्या मनावर परिणाम होणार नाही का ? नाही तरी "रिकामं डोकं हे सैतानाचं घर असतं" हे आपल्याला माहीतच आहेच. आता हिचं ताबडतोब लग्न करून देण्यातच हिचा फायदा आहे. तोपर्यंत हिला कुठलं, तरी काम देऊन गुंतवायला हवं."

माझं बोलणं त्यांना पटल्यासारख वाटलं. मी त्यांच्या घरातून बाहेर पडलो. चार दिवसांनी प्रशांत सांगत आला की, त्याच्या वडिलांनी सावंतच्या मदतीने त्या साधूला शोधून काढला होता आणि पोलिसात देईन अशी धमकी देऊन त्याच्याकडून एक्कावन रुपये परत मिळवले होते. मी माझ्या हातावरील बोटावर अजून न गेलेल्या निळ्या शाईकडे समाधानाने पहात होतो.



# प्लँचेट

'मित्रांनो आज कथामालेचा सहावा दिवस. आज मी तुम्हाला जी कथा सांगणार आहे, ती मला प्रख्यात मानसोपचारतज्ञ व संमोहनतज्ञ डॉ. प्रसन्नकुमारांनी सांगितलेली आहे." असे म्हणून विश्वासने कथेला सुरुवात केली.

ती संध्याकाळची वेळ होती. डॉ प्रसन्नकुमार आपल्या अभ्यासिकेत जाडजूड ग्रंथ काढून काहीतरी शोधण्याचा प्रयत्न करीत होते. तेवढ्यात दारावरची घंटी वाजली. रागावूनच ते दार उघडायला गेले. दार उघडले आणि समोरच्या व्यक्तीकडे प्रश्नार्थक मुद्रेने पाहिले.

"माफ करा, मी प्रा. देवभक्त. आणि ह्या माझ्या पत्नी." त्यांनी मागे उभ्या असलेल्या स्त्रीला समोर आणले.

"याना, या आत या." म्हणत डॉक्टरांनी स्वागत केलं. "हं. बोला काय काम काढलंत ?"

"आपली काही ओळख नाही. पण तुमचे मित्र श्यामराव यांनी मला तुमच्याकडे पाठविले आहे. मी तुमच्या दवाखान्यात येणार होतो. पण श्यामराव म्हणाले, "प्रथम घरीच जा. मी फोन करून कळवीन त्यांना."

"हो, कालच श्यामरावांचा फोन आला होता. म्हणजे त्यांनी पाठविलेले ते तुम्ही तर !" डॉ. खुशीत येऊन म्हणाले.

"डॉ. ही माझी दुसरी पत्नी." असं म्हणून प्रा. देवभक्तांनी विषयालाच सुरवात केली. पण त्यांना थांबवत डॉ. म्हणाले, "आपण माझ्या अभ्यासिकेत बसू. तोपर्यंत तुमच्या सौ.ना इथच बसू दे." नंतर त्यांच्याकडे वळून डॉ. म्हणाले, "इथं भरपूर मासिकं पडली आहेत. हवं तर टी. व्ही. चालू करू शकता. आम्ही जरा आत जाऊन बसतो, हं प्लीज !"

"हं आता बोला." अभ्यासिकेत आल्यावर डॉ. म्हणाले. "तर डॉक्टर सरिता ही माझी दुसरी पत्नी. मी निवृत्त व्हायला दोन वर्षे असतानाच हिच्याशी विवाह केला. सध्या आम्हाला एक मूल आहे. माझ्या म्हातारपणामुळे तिला एकटीला पुढे झेपणार नाही असं वाटल्यामुळे आम्ही नंतर इच्छा असतानाही अपत्य

होण्याचा प्रयत्न केला नाही. फारच समजूतदार आहे सरिता." "माझी पहिली पत्नी वारली ती एक मूल मागे ठेवून. त्याच्या सांभाळासाठी मी दुसरं लग्न केलं. आता ती मुलगी वीस वर्षांची झालीय. पण सरितानं कधी तिला सावत्रपणानं वागवलं नाही. अगदी तिच्या सख्या आईसारखं सगळं चांगलं चाललं असतांना आताशी सरिता मात्र विचित्रासारखी वागायला लागलीय. 'मला आता मूल होणारच. मला नववा महिना चालू आहे.' असं सारखं तिला वाटत असतं. मग ती सारखी रडत असते. हे सगळं दोन महिन्यांपासून सुरू झालं."

"आम्हा दोघांनाही प्लँचेट करायचा अन् आत्मे बोलवायचा भयंकर नाद. गंमत म्हणून प्लँचेटवर मोठ्या लोकांचे आत्मे बोलवायचे व प्रश्न विचाराचे असं आम्ही बरेचदा करतो. त्या दिवशीही आम्ही असंच प्लँचेट मांडून बसलो होतो. एका खडूनं जमिनीवर वर्तुळ काढून त्याच्या परिघावर ए टू झेड मुळाक्षरं लिहून मध्याभागी एक छोटसं भांडं पालथं घातलं. त्यावर आम्ही दोघांनी एकेक बोट ठेवून आत्म्यांना आवाहन केलं.

काही क्षण तसेच गेले. मग कळेल न कळेल इतक्या मंदगतीने पालथं भांडं फिरू लागलं. हळूहळू त्याचा वेग वाढला. भांडं एकेका अक्षरावर स्थिरावू लागलं. मी ती अक्षरे टिपून घेऊ लागलो. पहिला आत्मा आला तो शिवाजी महाराजांचा. मला आश्चर्यच वाटलं. अजूनही त्यांचा आत्मा मराठेशाहीच्या ऱ्हासामुळे दुःखी होऊन भटकतोय असं ते म्हणाले. मी त्यांना प्रश्न विचारला की, त्यांचा मृत्यू कशामुळे झाला ? त्यावर त्यांनी उत्तर दिलं, सोयराबाईनी मला विष घालून ठार मारले. मला गुडघी रोग झाला नव्हता. माझ्या बायकोने माझा खून केला. मग आम्ही त्यांना जायला सांगितलेय.

प्लँचेटवर आम्ही दुसऱ्या आत्म्याला बोलावलं, तो आत्मा होता आपल्या दिवंगत पंतप्रधान इंदिरा गांधींचा. बरोबरच आहे त्यांचा खून झाल्यामुळे त्यांच्या अनेक इच्छा अतृप्त राहिल्या होत्या. त्यामुळे त्यांना सद्गती मिळणं कठीणच होतं. आम्ही त्यांना प्रश्न विचारला, भारताचं कसं काय होईल याबद्दल तुम्हाला काळजी वाटत असेल नाही ? त्यावर त्या म्हाणाल्या की, राजीवला हे विरोधीपक्षातले आणि त्याचे स्वकीयही गोत्यात आणत आहेत त्याबद्दल मला चिंता लागून राहिली आहे. पण शेवटी राजीवच विजयी होणार असं मला दिसतंय. असंही त्या म्हणाल्या. आणखी एक दोन प्रश्न विचारल्यानंतर त्यांचा आत्मा गेला.

तिसरा आत्मा होता सरिताच्या लांबच्या मामेभावाचा. सरिताचा त्याच्यावर अन् त्याचा सरितावर फार जीव होता. तो अगदी देखणा आणि राजबिंडा होता.



सरिताने प्रश्न केल्यावर तो असं म्हणाला की, उद्या दुपारी तू पलीकडच्या शंकराच्या देवळाजवळ ये. तेथे पायरीवर एक सोन्याची अंगठी मी ठेवलेली असेन. ती तू घे. आणि प्रा. देवभक्तांना नजर कर. तसेच भिमाशंकराला जाऊन शंकराची पूजा बांध. असं म्हणून तो आत्मा निघून गेला.

दुसऱ्या दिवशी दुपारी आम्ही दोघे शंकराच्या देवळात गेलो. चिटपाखरूही नव्हतं तिथे. सरिता धावतच पायरीजवळ गेली. पण तिला काही अंगठी सापडली नाही. सरिता खूप निराश झाली. तिच्या केविलवाण्या नजरेकडे पाहून मी तिला सांगितले की, पुन्हा आपण प्लँचेटवर आत्मे बोलावण्याच्या फंदात पडू नये म्हणून.

पण दोन दिवसांनी मी काही महत्वाच्या कामासाठी बाहेर गेलो असताना, तिने पुन्हा प्लँचेट लावले आणि तिच्या मामेभावाला बोलावले. आल्या आल्याच तो अंगठी न ठेवल्याबद्दल क्षमा मागून म्हणाला की, तू एकटीच ये. उद्या मी नक्की अंगठी ठेवीन.

झालं. दुसऱ्या दिवशी ती एकटी गेली. पण आजही तेथे अंगठी नव्हती. तिने बराच वेळ वाट पाहिली. डोळ्यात अश्रू आणून त्याची प्रार्थना केली.तरीही तिची निराशाच झाली. शेवटी कंटाळून संध्याकाळी मी घरी पोहोचायच्या आत सरिता परतली. पण तेव्हापासून ती वेड्यासारखीच वागायला लागली आहे. तिच्या मामेभावाबद्दल ती सतत बोलत असते. आणि रडत असते. तिला मूल होणार आहे, ती नऊ महिन्यांची गर्भवती आहे; असं तिला सारखं वाटतंय. वास्तविक पाहता सध्या आम्ही भक्तिमार्गात असल्यामुळे गेले कित्येक महिने शरीरसंबंधच येऊ दिलेला नाही.

तिचं हे वेड कमी व्हावं म्हणून मी गेल्या दोन महिन्यात काही करायचं बाकी ठेवलं नाही. अनेक डॉक्टरांकडे गेलो. गंडेदोरे केले. अंगारे - धुपारे केले. पण काहीच परिणाम झाला नाही उलट परिस्थिती दिवसेंदिवस बिकट होत चाललीय.

काही मित्रांच्या सल्ल्यावरून आम्ही एका प्रख्यात मांत्रिकाकडे गेलो. त्याच्या अंगात आले, तेव्हा सरिताच्याही अंगात आले. त्यावेळी त्याने हिला तुमच्या पहिल्या बायकोनं झपाटलीय असं सांगितलं. ते भूत उतरवावं लागेल. त्याने तिला तू कोण आहेस असं विचारताच, मी पहिल्या पत्नीचं भूत आहे असे ती बोलली आणि एक बोकड मिळाल्यास सरिताला सोडून देईन असंही म्हणाली. मग त्याने दुसऱ्या दिवशी भूत उतरवण्याचा विधी करायचं ठरवलं. बोकडाचे पैसे आणि भरपूर दक्षिणा घेऊन दुसऱ्या दिवशी बोलावलं. भूत

उतरवण्याचा विधी केला. शेवटी बोकड मारल्यावर सरिता बेशुद्ध पडली. मांत्रिकानं भूत उतरल्याचं जाहीर केलं आणि पुन्हा दक्षिणा घेतली. नंतरचे दोन-तीन दिवस बरे गेले. पण पुन्हा ती मला मूल होणार आहे म्हणून रडायला लागली. आणखीनच वेड्यासारखं करायला लागलीय.

परवाच एका स्त्री-ज्योतिष्याकडे तिला नेली. तिने तिच्या दिव्य लोलकातून पाहून आमच्या भूतकाळातील काही घटना व आमच्या घराचे वर्णन केले. त्यातील बऱ्याचशा गोष्टी खऱ्या होत्या. तिने असं सांगितलं की, आमच्या हितशत्रूंपैकी कुणीतरी हिला मूठ मारली आहे आणि ती मूठ परतवली पाहिजे. त्यासाठी तीनशे रुपये खर्च येईल. पैसे दिल्यावर तिने मूठ फिरवण्याचा विधी केला. तिने सरिताला पाठमोरी उभी रहायला सांगितले. मंत्र म्हणत असताना एक पेय प्यायला दिले. काही क्षणानंतर तिने इतक्या जोरात तिची मूठ सरिताच्या पाठीवर हाणली की, सरिता पुढे कोलमडलीच. मी तिला सावरले. तेव्हढ्यात ती भडभडा ओकली. मग ती ज्योतिषी म्हणाली की, आता मूठ परतली आहे. तुम्ही निश्चिंतमनाने घरी जा. पण तरीही काही फायदा झाला नाही. आजपासून पुन्हा ती "मला गर्भारपणाचा त्रास होतोय म्हणून रडू लागली आहे."

डॉ. प्रसन्नकुमारांनी देवभक्तांना बाहेरच्या खोलीत आणले व सरिताकडे वळून म्हणाले,",चला, आता आपण माझ्या अभ्यासिकेत बसू."

अभ्यासिकेकडे जाताना डॉ. प्रसन्नकुमार विचार करीत होते. सरिता चाळीशीच्या जवळपास असली तरी तरूण दिसत होती. सुंदर तर होतीच. पण तब्येतही एखाद्या तरुणीला लाजवेल अशी सुदृढ होती. बांधा सुडौल होता. चेहऱ्यावरून ती शालीन व नम्र वाटत होती. कदाचित तिला जुन्या संस्कारात वाढविले गेल्यामुळे हा परिणाम झाला असावा. असं त्यांना अभ्यासिकेत शिरताशिरता वाटलं.

डॉ. प्रसन्नकुमारनी तिला संमोहित अवस्थेत नेलं आणि डॉ.नी विचारलेल्या सूचक प्रश्नांना उत्तरं देऊ लागली.

"मी लहानपणापासूनच कुळाचार, धार्मिक रूढी, पूजाअर्चा अशा कर्मठ वातावरणात वाढले. तरीही आमच्या घरी तसा मोकळेपणा होता. त्यामुळे मी कुणाशीही केव्हाही बोलू शकत असे. त्यांच्याबरोबर बाहेर जाऊ शकत असे. घर सुशिक्षित असल्यामुळे असेल कदाचित, मी वयात आल्यानंतरही माझ्या मित्रांबरोबर बोलण्यास मला मुभा होती.

हा माझा पहिला विवाह असला तरी माझ्या पतीचा हा दुसरा विवाह आहे. त्यामुळे आमच्या वयात अंतरही बरेच आहे. खरं तर माझं माझ्या मामेभावावर प्रेम होतं. आम्ही लग्नही करणार होतो. आमच्यात मामेबहीण वा भाऊ



लग्नासाठी चालतो. पण बाबांनी माझं लग्न प्रा. देवभक्तांशी लावलं. घरी मोकळं वातावरण जरी होतं, तरी मला माझ्या प्रेमाबद्दल एक अक्षरही काढायचं धाडस झालं नाही. मामेभाऊही काही बोलू शकला नाही. खंगून खंगून शेवटी तो वारला. मी मात्र लग्नानंतर यांच्याशी एकनिष्ठ राहिलेय. आता आम्ही सुखी आहोत. ह्यांच्या वाढत्या वयामुळे आम्ही दुसरं मुलं होऊ न देण्याचा निर्णय घेतला. तेव्हापासून ते देवघरात तर मी मुलांच्या शेजारी झोपते.

प्लँचेटवर आत्मे बोलवायला ह्यांनीच मला शिकवले. मामेभावाच्या आत्म्यानं अंगठी देवळाच्या पायरीवर न ठेवल्यामुळे मी ह्यांच्या नकळत प्लँचेट केलं. तो प्लँचेटवर आला तेव्हा त्याने मला बऱ्याच गोष्टी सांगितल्या. पण मी त्या ह्यांना सांगता कामा नये असेही बजावले. तो अजूनही माझ्यावर प्रेम करतोय. तो म्हणतोय माझी अपूर्ण राहिलेली इच्छा मला पूर्ण करायचीय.

त्या प्लँचेटनंतर तो अनेकदा रात्री माझ्याकडे आला. माझ्यासोबत झोपू लागला. माझंही पूर्वीच प्रेम जागृत झालं. मी त्याच्या मोहात पुन्हा सापडले. अजूनही तो कसा राजबिंडा-अगदी पूर्वी होता तसाच दिसत होता. त्याचा आणि माझा शृंगार दिवसेंदिवस रंगत चालला. तो देत असलेल्या शरीरसुखानं मी तृप्तीच्या सागरात विहार करू लागले. त्याच्या मिठीत जाण्यासाठी मी सतत आसुसलेली असते. एकदा त्याने माझ्या स्तनावर हलकासा चावा घेतला. त्या गोड वेदनेने मी विव्हळले. पण त्या चाव्याची खूण मात्र तशीच आहे. मला भीती वाटते माझ्या पतीने जर ती खूण पाहीली तर मी काय सांगणार ? त्यालाही भीती बोलून दाखवल्यावर तो रागाने लाल झाला अन् म्हणाला,"जर आपल्याविषयी तू तुझ्या पतीला सांगितलंस तर मी तुला ठार मारीन म्हणून."

एवढं बोलून तिने तिचा ब्लाऊज काढला. स्तनावरची ती खूण दाखवली. आणि मुसमुसून रडू लागली. रडतारडता ती बोलू लागली, "मला आता त्याच्यापासून मूल होणार आहे. सध्या नववा महिना चालू आहे. मला मूल झाल्यावर सगळ्यांना कळेल की मी व्यभिचारी आहे. ह्यांना काय वाटेल याची मी कल्पनाच करू शकत नाही." पुन्हा ती जोरजोराने रडू लागली.

डॉ. प्रसन्नकुमारांनी हळूहळू तिला संमोहन अवस्थेतून जागं केलं. तिला बाहेरच्या खोलीत जाण्यास सांगून प्रा. देवभक्तांना आत पाठवायला सांगितलं.

प्रा. देवभक्त आत येताच डॉ.नी चढ्या आवाजात बोलायला सुरूवात केली, "तुमच्या दोघांच्या घेतलेल्या मुलाखतींवरून मला असं स्पष्ट दिसायला लागलय की, ह्या सर्व घटनांना तुम्हीच जबाबदार आहात."

"मी......मी......अहो डॉ. काय बोलताय काय ?" प्रा. देवभक्त गांगरून म्हणाले.

डॉ. प्रसन्नकुमार आता समजावणीच्या आवाजात सांगू लागले,"तुम्ही दोघेही

अनेक वेडगळ समजुती आणि अंधश्रद्धांच्या अहारी गेलेला आहात. तुम्ही तर प्राध्यापक....शिकलेले....चांगले सुशिक्षित. तुमच्यातही तार्किक विचारसरणी नसावी ? मग मुलांना 'लॉजिक' कसे काय शिकवता ?

तुम्हाला तरी दोष देऊन काय उपयोग म्हणा ! आपल्या समाजात सर्वत्रच लहानपणापासून भुतेखेते, राक्षस, मंत्रतंत्र, जादूटोणा असल्या कल्पना बाळगून संस्कार केले जातात. मग कितीही शिकलो तरी ह्या कल्पना पाठ सोडतच नाही. त्यासाठी खंबीरपणे सामोरं जाणारं मन आपलं शिक्षण तयार करतच नाही.

म्हणूनच प्लँचेटवर आत्मे बोलावता येतात... ते आपल्या प्रश्नांची उत्तरे देतात, आपली समस्या निवारतात; अशा समजुती आपण करू शकतो. सरिता मुळात संवेदनाशील व हळवी आहे. त्यामुळेच ती अशी भ्रमिष्टासारखी वागायला लागली. प्लॅन्चेटवर जरी तुम्ही दोघांनी हाताची बोटे पालथ्या भांड्यावर ठेवली होती, तरी ते भांडे पुढे सरकले ते सरिताच्या अंतःप्रेरणेने. याला आम्ही 'सायको-मोटर' असं म्हणतो. तिच्या बोटातील स्नायूंनी तिच्या नकळत ती हालचाल घडवून आणली होती. म्हणूनच तिने एकटीनेही जेव्हा प्लॅन्चेट केले, तेव्हासुध्दा ती आत्म्याला बोलावू शकली.

तसेच तिच्या मामेभावाबरोबरचा तो शृंगार म्हणजे लैंगिक उपासमारीमुळे एका तरूण स्त्रीने मानसिक पातळीवर अतृप्त इच्छा तृप्त करून घेण्याचा हा प्रयत्न होय. तिचा मामेभाऊ प्लॅन्चेटवर आल्या दिवसापासूनच ती अशी भ्रमिष्ट झाली आहे. तो येणे... तिच्या बरोबर त्यानं झोपण... तिला मिठीत घेणं हे सारे तिला झालेले भास आहेत. तिच्या मनात कोंडलेल्या इच्छेला ती अशा विकृत स्वरूपात बाहेर काढतेय. ह्या घटनांशी ती एवढी एकरूप झालीय की, तिला ते भास वाटतच नाहीत. म्हणूनच मग तिला ते भास वाटतच नाहीत. म्हणूनच मग तिला नववा महिना आहे व मूल होणार आहे, हे खरं वाटायला लागलंय.

तुमचं नशीब समजा की, सरिता चांगल्या संस्कारात वाढली म्हणून, नाहीतर तिची नैसर्गिक भूक भागवण्यासाठी तिने व्यभिचारी मार्ग पत्करला असता. पण ती बिचारी आपली नैसर्गिक भूक स्वतःच्या मनोभासाद्वारे भागवण्याचा केविलवाणा प्रयत्न करीत होती. खरं तर अशावेळी तुम्ही ढोंगी बुवा आणि मांत्रिकांच्या नादी लागण्यापेक्षा प्रथम मानसोपचारतज्ञाकडे घेऊन जायला हवं होतं. पण आज तुम्ही माझ्याकडे आलात ते तुमचे सर्व उपाय थकल्यावर किंवा असंही तुम्हाला वाटलं असेल, एवढे उपाय केले. आता हाही उपाय करून बघू. मला तुम्हाला खिजवायचं नाहीय. पण एक सत्य परिस्थितीकडे आपण कशी डोळेझाक करून आपलं जीवन दुःखी करून घेतो हे सांगायचं आहे.

माझ्या ह्या बोलण्यावरून आता तुमच्या लक्षात आलंच असेल की,



सरिताला होणारा त्रास हा मानसिक आहे ह्या मानसिकतेतूनच प्लॅन्चेटने तिला पुत्रप्राप्ती होईल की काय असं वाटायला लागल. मी हा त्रास आजच थांबवू शकेन. मात्र तुमचं सहकार्य हवंय

सर्वात पहिलं म्हणजे तुम्ही तुमचा भक्तिमार्ग बंद करा आणि सरळ पणे पतीची भूमिका मनापासून पार पाडायला लागा. भक्तिमार्गात ब्रम्हचर्य पाळून तुम्ही एकवेळ तुमच्या मनावर वय वाढल्यामुळे संयम पाळू शकाल. पण सरिता सारख्या तरूण स्त्रीला संयम पाळायला लावणं म्हणजे तिच्यावर अन्याय आहे. तुमची दुसरी पत्नीही वयस्क असती तर काही प्रश्न नव्हता. ह्या अशा खुळ्या समजुतींमुळेच लोकांची नीतिमत्ता बिघडण्यासाठी आपण हातभार लावत असतो. शिवाय चांगल्या घरची मुलगी वाया गेली म्हणून शिंतोडे उडवायला मोकळे. जैन लोकांतील दीक्षांत समारंभातही धर्माच्या नावाखाली अनेक तरुणींच्या आयुष्याचा होम केला जातो. त्यांना बळजबरीने ब्रम्हचर्य पाळावं लागतं. कारण त्यांचं देवाशी लग्न लागलेलं असतं. हाच प्रकार यल्लम्मा देवीला वाहिलेल्या पोरींच्या वाटेला येतो. खरं तर धर्माच्या नावाखाली आपण वेश्या – व्यवसायच पोसत असतो. जेव्हा आपण या भयानकतेतून बाहेर पडू तोच खरा सुदिन.

तुम्हाला जर या पुढे मूल नको असेल तर कुटुंब नियोजन केंद्राचा सल्ला घ्या. त्यावर समाधी लावून बसणे हा उपाय होऊ शकत नाही. आज विज्ञानाने ह्या बाबतीत किती वेगवेगळ्या प्रकारच्या सुविधा दिल्या आहेत. तरी आपण त्यांचा उपयोग न करता देवावर हवाला ठेवून मोकळे होतो."

डॉक्टरांचं बोलणं प्रा. देवभक्तांना पटलं. त्यांनी सरिताला या आजारातून मुक्त करण्याची विनंती केली. डॉ. नी सरितालाही आता अभ्यासिकेत बोलावून तिला कोचावर विश्रांती घेण्यास सुचवून, पुन्हा संमोहित केले.

संमोहित अवस्थेत गेल्यावर ते तिला आज्ञा करु लागले की मी तुझा मामेभाऊ आलो आहे. ही माझी अगदी शेवटची भेट आहे. यापुढे मी तुला भेटणार नाही.

मामेभावाला पाहून सरिताचा चेहरा खुलला. प्रसन्नकुमार पुन्हा बोलू लागले, "आपल्या शृंगारातून होणारे मूल मी तुझ्या पोटातून घेऊन जात आहे. ते आता पुन्हा तुला कधीही मिळणार नाही. हीच माझी इच्छा होती. माझ्या ऐवजी आता तुझा पतीच रोज येत जाईल. त्याला तू खूपच आवडू लागशील व तोही तुला आवडू लागेल. तुम्ही दोघे आता आनंदात राहाल."

थोड्या वेळाने ती जागृत अवस्थेत आली. तिच्या चेहऱ्यावरचा ताण नाहीसा झालेला होता. डॉ. प्रसन्न कुमारांनी त्यांना शुभेच्छा दिल्या.

महिन्याभराने प्रा. देवभक्त व सरिता आनंदी आणि हसतमुख चेहऱ्यांनी डॉ.प्रसन्न कुमार यांच्या घरी आले आणि त्यांनी त्यांना जेवायला यायचे आमंत्रण दिले.



# प्रकाशणारी झाडे आणि आग्या वेताळ

"तांदुळवाडीच्या किल्ल्यापर्यंत पोहचायला आम्हाला संध्याकाळचे पाच वाजले. किल्ल्याच्या तटाजवळ बांधलेल्या सरकारी डाकबंगल्यातच आमचा मुक्काम होता. मी, सुहास आणि प्रदीप जीवशास्त्राचे पदवीधर असल्यामुळे, तांदुळवाडीच्या जंगलात वनस्पतींचे नमुने गोळा करण्यासाठी आलो होतो." अशी सुरुवात करून विश्वास बोलू लागला, "डाकबंगल्यात पोहचताच तिथल्या खानसाम्याला आम्ही हा बंगला दोन दिवसांसाठी आरक्षित केल्याची कागदपत्रे दाखवली आणि आमची राहण्याची व्यवस्था करायला सांगितली. जंगलात फिरण्यासाठी जंगलाची खडान् खडा माहिती असणारा एखादा माणूस मिळेल का अशी विचारणा केल्यावर, त्याने जागल्याचे नाव सुचविले.

खानासामा आम्हाला चहा देऊन खालच्या वाडीत गेला. आम्हीही आमचं सामान खोलीत टाकून वऱ्हांड्यात येऊन गप्पा मारत बसलो. पश्चिम रेल्वेवरील सफाळ्यापासून पाच किलोमीटर अंतरावर हा तांदुळवाडीचा किल्ला आहे. ह्या किल्ल्याच्या पलीकडेच, अहमदाबाद हायवेच्या बेचक्यात एक घनदाट जंगल आहे. अजूनही त्या जंगलात कोल्हे, तरस, साळिंदर, ससे यासारखे छोटे प्राणी असतात. आजूबाजूच्या परिसरात आदिवासी वस्तीही मोठ्या प्रमाणात विखुरलेली आहे. त्या घनदाट जंगलात नाना प्रकारच्या वनस्पती सापडतात म्हणूनच, मी मुंबईपासून जवळच असलेल्या ह्या परिसरात बरेचदा येतो. ह्या जंगलात मात्र आजपर्यंत गेलो नव्हतो. छान निसर्गरम्य परिसर असल्यामुळे या भागात यायचा मोह आवरत नव्हता. मागच्याच आठवड्यात वसईतल्या एका जडीबुटीवाल्याने या जंगलात अद्भूत वनस्पती आणि प्रत्ययकारी गुणधर्म असलेल्या जडीबुटी मिळत असल्याची माहिती दिली होती. ह्या जंगलात सहसा कोणी प्रवेश करत नसल्याचंही सांगितलं होतं. तेव्हा त्या वनस्पतींचे नमुने गोळा करण्यासाठी सुहास अन् प्रदीपला भरीस घालून घेऊन आलो होतो.

"काय झकास वारा सुटलाय नाही." सुहासच्या बोलण्याने मी भानावर आलो.

"अरे, मुंबईच्या जवळ पण तरीही दूर अशा या ठिकाणी त्या प्रदूषित हवेपेक्षा हा वारा किती वेगळा वाटतोय." प्रदीप कौतुकाने म्हणाला.

"सारा क्षीण एका क्षणात नाहीसा झाला इथंच एखादं घर बांधून राहायला हवं." सुहास.

"आपल्याकडे खूप पैसे असते ना. तर मी मुंबई सोडून इथेच राहिलो असतो बघ." प्रदीप.

मी काही बोलणार इतक्यात तो खानासामा आणि त्याच्या बरोबर एक काळीकुट्ट बुटकी मूर्ती समोर येवून उभी राहिले.

"साहेब हा जागल्या." खानसामा म्हणाला. अन् जागल्याने नमस्कार केला.

मी म्हटलं, "काय जागल्या, तुला म्हणे जंगलची सर्व माहिती आहे ना? अगदी गुरवाटांसकट"

"साहेब, ह्या जंगलातच जन्मलो. अगदी त्याच्या बारीकसारीक वनस्पतींसकट मला ह्या जंगलची माहिती आहे. तुम्ही मुंबईचे नव्हं?"जागल्या म्हणाला.

जागल्या बोलघेवडा वाटत होता. त्याला समोर बसवून आम्ही जंगलाची माहिती विचारायला लागलो. तेव्हा त्याने आम्हाला जंगलातील एका ठिकाणाबद्दल अद्भूत माहिती सांगितली.

ह्या जंगलाच्या मध्यावर एक छोटं तळं आहे. त्या तळ्याच्या आसपास प्रचंड झाडी वाढलीय. एका कोपऱ्यावर तळ्याच्या किनाऱ्याला लागूनच एक मोडकळीला आलेला वाडा आहे.

"आज रात्री त्या वाड्यातच गेलं तर? सुहासने प्रश्न टाकला.

अंगावर शहारे आणून प्रचंड घाबरलेला चेहरा करत म्हणाला,"साहेब, काय येडबीड लागलं काय तिकडे जायला. आवो, तिकडं गेलेला कुनीबी परत आलेला नाय. त्या वाड्यात आणि त्याच्या भोवताली लावलेल्या जांभळांच्या झाडांवर आग्या वेताळ अन् त्याचा कुटुंब-कबिला राहतोय.तिकडं चुकून जरी पोहोचलात तरी तुमची काय धडगत नाय. तुम्हाला जीव प्यारा असला तर असा इच्चार करू नका.

मागल्या वर्षीचंच बघा. चार शिकारी आले होते. आम्ही त्यांना खबरदारी म्हणून तिकडं जायचं नाही म्हणून सांगितले, तरी ते त्या वाड्यात गेलेच. पण, त्यांना ठाऊक नव्हतं की,आग्या वेताळ आणि त्याची वाढणारी पिलावळ, दिवसा प्राण्यांच्या रूपानं जंगलांत भटकतात. एखाद्याला भुलवून तिकडं आणतात, आणि मग त्याचं रक्त पित्यात. आमच्यापैकी त्यांच्या बरोबर कुणी गेला असता तर आज ते जिवंत असते. आमच्या भगतानं तिथे आग्या वेताळ, त्याची बायको आणि पोरं ह्यांना पाहिलंय. कारण भगतापुढं त्याचं काही चालत नाही.



एकदा तर भगतानं मला आणि माझ्या चार मित्रांना संरक्षक माळा घालून ते दृश्य पाहायला नेलं होतं. वाड्यासमोरच्या दोन मोठ्या झाडावर आग्या वेताळ व त्याची बायको राहते तर इतर झाडांवर त्यांची मुलं. ती झाडं रात्री चमकत असतात. गेल्या काही वर्षांपासून त्यांची संख्या वाढायला लागलीय. कारण आग्या वेताळाची वाढणारी पोरं. रात्री ते झाडावरील प्रकाश रूपानं सावज हेरतात; तर दिवसा प्राण्यांच्या रूपानं!

प्रदीप म्हणाला,"ए बाबांनो, मी तर काय तुमच्या बरोबर जंगलांत येणार नाही. मी आपला येथेच थांबतो. तुम्ही जा."

"जारे भित्रीभागूबाई" असं म्हणून सुहासने त्याला चिडवलं.

मी मात्र त्या वाड्याजवळ जाऊन त्या आग्या वेताळाला पाहायचं ठरवत होतो. सुहासचा पाठिंबा दिसत होता.

जागल्याची बरीच मनधरणी केल्यावर तोही काही अटींवर कबूल झाला."मी तुम्हाला ते दुरून पाहायला देईन. जास्त जवळ जायचं नाही. कोणतंही हत्यार, बंदूक जवळ बाळगायचं नाही. संरक्षित माळ गळ्यात घालायची. मी सांगितलेल्या रेषेच्या बाहेर पाऊल टाकायचं नाही".

आम्ही आमची जेवणं आटोपली. तोपर्यंत रात्रीचे नऊ वाजत आले होते. मी दुर्बीण गळ्यात अडकवली. त्याने पुन्हा सागिंतलं की, कुठलंही हत्यार घेऊ नका म्हणून. आम्ही काय शिकारी नसल्यामुळे बंदुकबिंदूक आमच्याजवळ असणं शक्यच नव्हतं. सुहासने त्याचा कमांडर टॉर्च घेतला आणि प्रदीपच्या हातात दोर दिला. तेव्हढाच त्याला धीर, जागल्याने आमच्या प्रत्येकाच्या गळ्यात, हळदीच्या तुकड्यांची व त्यात एक रूद्राक्ष बसवलेली माळ घातली. तशीच स्वतःच्या गळ्यातही घातली. सगळी तयारी झाली अशी त्याची खात्री पटल्यावर आम्ही निघालो.

साधारणतः तीस मिनिटे चालल्यावर त्याने सुहासला टॉर्च बंद करायला सांगितला आणि खाण कामगारांसारखा डोळ्यावर पट्टयाने बांधलेला त्याचा टॉर्च त्याने सुरू केला. पुन्हा एकदा प्रत्येकाच्या गळ्यातील माळ चाचपून बघितली. आणि त्याच्या मागे दबकत दबकत यायला सांगितले. प्रदीपने माझा हात घट्ट धरून ठेवला होता. त्याच्याही हाताला थोडासा कंप सुटल्यासारखा वाटत होता.

"हे बघ, इथं घाबरून चालणार नाही. तुझ्या मनाला खंबीर कर. काय होईल ते आपल्या सगळ्यांचं एकदम होईल. तू एकटा नाहीस. आम्ही तुझ्याबरोबर आहोत "मी संथपणे पण प्रत्येक शब्दावर जोर देत त्याच्या कानात कुजबुजलो. त्याच्या खांद्यावर आश्वासक हाताने दाबले. त्याला थोडा धीर आला.

आणखी दहापंधरा मिनिटं आम्ही चाललो असू, जागल्या एकदम थांबला. आता आम्ही एका लहानशा मोकळ्या जागेत होतो. त्याने एका दिशेकडे पहायला सांगितलं.

जागल्या म्हणाला होता ते पूर्णपणे खरं होत. समोर जवळजवळ पाचशे फुटांवर सारं आकाशच खाली आल्यासारखं वाटत होतं. तेवीस ते चोवीस लहान मोठी झाडं चांदण्यांसारखी संपूर्ण फांद्याफांद्यातून चमचम करीत प्रकाशत होती. मी डोळ्याला दुर्बीण लावून ते पाहायला लागलो. क्षणभर माझे डोळे दिपलेच. दुर्बिणीमुळे माझ्या असं लक्षात आलं की त्या सगळ्या झाडांमधून दोन मोठी झाडं जरा वेगळी आहेत. माझी ही शंका जागल्याला विचारल्यावर त्यांन सांगितलं की"त्या झाडांपैकी डावीकडचा आग्या वेताळ अन् उजवीकडची त्याची बायको. बाकी सगळी त्याची पिल्लावळ आहे. जसजशी वर्षे जाताहेत तसतशी ही पिल्लावळ वाढतेय आणि जवळच्या इतर झाडांवर राहाताहेत म्हणूनच तर दरवेळेला प्रकाश देणाऱ्या झाडांची संख्या वाढतेय. आता ही प्रकाशरूपानं आपलं सावज हेरताहेत. आपण गळयात माळा घातल्यामुळे त्यांनी आपल्याला जरी पाहिलं, तरी ते काही करू शकणार नाहीत." जागल्या आत्मविश्वासाने सागंत होता. त्याचा टॉर्च त्याने कधीच बंद केला होता. हेही आता माझ्या लक्षात आलं.

मी आणखी पुढे जाऊन जवळून न्याहळायची इच्छा प्रदर्शित केली. पण प्रदीप अन् जागल्यानं मला एकही पाऊल पुढे टाकू दिलं नाही. शेवटी आम्ही रात्री डाकबंगलावर परतलो. झोपायला जाण्यापूर्वी मी जागल्याला पहाटे लवकर उठवायला सांगितलं.

मला रात्री तशी फारशी झोपच आली नाही. पहाटे पुन्हा तिकडे जाऊन काय करायचं याचा विचार करत होतो. त्यामुळे मीच जागल्याला उठवलं अन् पुन्हा तिकडे चलायला सांगितले. तो बरेच आढेवेढे घेऊ लागला. तेव्हा त्याची मूठ दाबून त्याला तयार केलं. पैसे दिसल्यावर तो ताबडतोब तयार झाला. सुहासलाही जाग केले. प्रदीपला मात्र झोपू दिलं. आम्ही तयारी करून पुन्हा निघालो.

चालता चालता रात्री येताना प्रदीपच्या कानाजवळून एक वटवाघूळ फडफडून गेल्यावर तो कसा घाबरला होता ते आठवून मला हसायला आलं. उजाडायला लागल्यावर आम्ही कालच्या ठिकाणी पोहोचलो. दुरून तो वाडा अन् झाडं दिसायला लागली होती. जागल्या आम्हाला ओरडून त्यांच्या जवळ जाऊ नका म्हणून कळवळून सांगत होता, तरी आम्ही त्या झाडांजवळ जाऊन पहाणी करू लागलो.



ती दोन उंच झाडं पूर्णपणे सुकलेली होती, तर दुसरी झाडं सुकायला लागली होती. त्या झाडांच्या खोडावर आणि फांद्यांवर पिवळया रंगाचा वर्ख चढल्यासारखा वाटत होता. हा वर्ख त्या दोन उंच झाडांवर मोठ्याप्रमाणात होता. मी पट्कन् चाकू काढून त्या झाडाचा एक मोठा ढलपा सुरक्षितपणे माझ्या झोळीत टाकला. अन् आम्ही डाक बंगल्यावर फोहोचलो. प्रदीप एव्हाना आंघोळ करून तयार झाला होता. आल्याआल्याच त्याने आम्ही कुठे गेला होतो म्हणून विचारलं तेव्हा त्याला सुहासने कालच्याच ठिकाणी गेलो होतो म्हणून सांगितलं. मग आम्ही दुपारपर्यंत आम्हांला हव्या त्या वनस्पतींचे नमुने गोळा करून घरी यायला निघालो. निघताना मी विशेषकरून जागल्याचे अभार मानले.

मुंबईला आल्याआल्याच माझ्या कॉलेजमधील जीवशास्त्राच्या प्रयोगशाळेकडे धाव घेतली. झोळीतून तो ढलपा काढून, त्यावरील थोडासा पिवळा वर्ख काढून मी सूक्ष्मदर्शकाखाली तपासू लागलो आणि एकेक कोडं उलगडू लागलं. जागल्याच्या आग्या वेताळ, त्याची बायको आणि त्याची पिलावळ ह्या विषयीचं मला हसू येऊ लागलं.

मी सुहास आणि प्रदीपला फोनवरून "आज रात्री आग्यावेताळाची नातवंडं पाहायला घरी या." म्हणून आमंत्रण दिले. ते आल्यानंतर त्यांना माझ्या अभ्यासिकेत घेऊन गेलो. तिथे टेबलावर तो ढलपा उभा ठेवला होता. घरातील सगळे दिवे घालवून अंधार केला. काही क्षणातच तो ढलपा प्रकाशू लागला. चमचम चांदण्या घरातच अवतरल्या. मी प्रदीपला म्हटले,"बघ ही आग्यावेताळाची नातवंडं मी घरात आणलीय." प्रदीप अजूनही बुचकळ्यात पडला होता. मग मी माझ्या परीक्षणाचा निष्कर्ष मांडायला सुरुवात केली.

"वनस्पती चमकणे किंवा प्रकाशित होणे हा काही त्यांचा गुणधर्म नाही; तर त्यांच्यावर वाढणाऱ्या बुरशीचा तो गुणधर्म असतो. सगळ्याच प्रकारच्या बुरश्या प्रकाशदायी नसल्या तरी काही विशिष्ट बुरशींमध्ये हा गुणधर्म असतो. आणि बहुधा सुकणाऱ्या झाडांवरच त्यांचं वास्तव्य असतं. कारण सुकलेल्या झाडाचं खोड कुठल्याही प्रकारचा प्रतिकार बुरशीच्या वाढीला करू शकत नाही. अशा या प्रकाशण्याच्या क्रियेला जैविक प्रकाश असे म्हणतात. त्याचा आग्या वेताळाशी आणि त्याच्या पिल्लावळीशी काहीही संबंध नसतो. आपल्या अज्ञानामुळे आणि भीतीच्या पगड्यामुळे आपण ह्या कथा फैलावत असतो आणि त्याचा उपयोग खेड्यात भगतासारखे संधीसाधू लोक करून घेत असतात.

अशाप्रकारे जैविक प्रकाश देणारे कीटक आणि मासेही असतात. खोल समुद्रातील अंधारात ह्या माशांचा प्रकाश आपल्या प्रियकर व प्रेयसीला

आकर्षित करण्यासाठी उपयुक्त ठरतो, तर इतर जलचरांना घाबरवण्यासाठी.

तुम्ही प्रकाश देत उडणारा काजवा पाहिलाय ना? त्यामधील पुल्लिंगी काजवाच प्रकाश देत उडतो. स्त्रीलिंगी काजवा झाडाच्या खोडांवर किंवा जमिनीवरील खबदाडीत राहतो. तिला आकर्षित करण्यासाठी हा प्रकाश उपयोगी पडतो.

दाट जंगलात तर अशाप्रकारचे अगणित जीवाणू त्यांच्या शरीरातील प्रोटीन्सचे विघटन करून प्रकाश निर्माण करीत असतात. या प्रकाशाचा रंग बहुधा हिरवा, निळा, लाल व पिवळा असतो. त्यामुळे कधी कधी जाळ पेटल्यासारखा भास होतो.

जैविक प्रकाशासारखीच दुसरीही एक क्रिया असते. तिला 'स्फुरदीप्ती' असे म्हणतात. काही प्रकारचे शंख, गोगलगायी आणि कुजणारे प्राणी यांचा हा गुणधर्म असतो. जैविक प्रकाश देण्याची क्रिया ही त्या कीटकांच्या मज्जा–संस्थेमार्फत नियंत्रित केली जाते; तर स्फुरदीप्ती मात्र अनियंत्रित असते. स्फुरदीप्तीत हाडातील फॉस्फरसचे विघटन होऊन तो सावकाशपणे वातावरणात सोडला जातो. त्याचे हवेबरोबर मंद ज्वलन होऊन तो प्रकाशू लागतो. म्हणूनच स्मशानात प्रेत जळून गेल्यानंतर काही काळाने त्या ठिकाणाहून प्रकाश येत असल्यासारखा भास होतो. आपण मात्र भुतं हाडं तोंडात घेऊन नाचताहेत असा निष्कर्ष त्यातून काढतो.

तसंच या तांदुळवाडीच्या जंगलाचं आहे. तेथे ना आग्यावेताळ होता, ना त्याची पिल्लावळ. ती होती निव्वळ बुरशी. एका झाडावरून दुसऱ्या झाडावर पसरत जाणारी. जागल्याला मात्र वाटतं की, "आग्यावेताळाची पोरं वाढताहेत म्हणून. किती ही अंधश्रद्धा !"



# भानामती नव्हे मानसिक रोग

जळगाव जिल्ह्यातील नसिराबाद जवळच्या खेड्यात घडलेली ही घटना नशिराबादहून सुहासच पत्र आलं की आमच्या गावाजवळच्या खेड्यात एका जमीनदाराच्या घरात भानामती होतेय. तेव्हा तू ताबडतोब इकडे ये. तो जमीनदार माझ्या ओळखीचा आहे. त्याला काही मदत करता आली तर पाहू. म्हणून, मी नशिराबादला गेलो.

मी व सुहास त्या खेड्यात जायला निघालो. तेव्हा वाटेत सुहास मला जमीनदार नानासाहेबां बद्दल माहिती देत होता.

"नानासाहेब म्हणजे ह्या भागातलं एक बडं प्रस्थ." सुहास सांगू लागला, "त्यांची जवळ जवळ साठ एकर बागायती जमीन आहे. ऊस, द्राक्षं आणि केळी ही बागायती पिकं ते घेतात. सध्या त्यांनी पपई आणि लिंबांचीही लागवड केलेली आहे. त्यांच्या घरी त्यांची पत्नी-अक्काबाई आणि त्यांनी अनाथाश्रमातून आणलेली त्यांची मुलगी, सुनीता एवढीच मंडळी असतात. अर्थात् काही गडीमाणसंही आहेत. नानासाहेबांचं हे कुटुंब शेतातच एका बंगल्यात वास्तव्य करीत आहे. पण, एक आहे, त्या मुलीला तिचे दत्तक आई-बाबा आहेत हे माहीत नाही. तिला त्यांनी ही गोष्ट आजतागायत सांगितली नाही. ती नशिराबादच्या शाळेत सातवीत शिकतेय. दररोज तिला न्यायला आणायला त्यांची गाडी येते.

सारं कसं सुरळीत चालू होतं. पण, गेल्या सहा महिन्यांपासून त्यांच्याकडे भानामतीचा प्रकार सुरु झालाय. त्याने ती सगळी मंडळी अगदी त्रस्त झालीयत. आतापर्यंत चार मांत्रिक व तीन भगत येऊन भानामती उतरवून गेले. पण त्रास मात्र काही शमला नाही. उलट दिवसेंदिवस वाढतोय. ह्या मांत्रिक आणि भगतांना त्यानी आजपर्यंत दोन अडीच हजार रुपये दिले. पैसापरी पैसा गेला. पण, उपयोग मात्र काडीचाही झालेला नाही. आता तर सर्वांनाच ह्या घराला भानामतीनं झपाटल्याचं कळल्यामुळे, ही मंडळी आपलं कुतूहल शमवण्याकरिता नानासाहेबांच्या बंगल्याला भेट देत असतात. त्यांच घर म्हणजे एक प्रदर्शनीय वस्तू झालीय जणू.

चालता चालता आम्ही नानासाहेबांच्या मळयाकडे जाण्यासाठी जी पायवाट

लागते तिच्या मध्यावर असलेल्या चहाच्या टपरीत थांबलो. टपरीत बरीच खेडूत मंडळी बसली होती. त्यांची चर्चाही नानासाहेबांच्या भानामती बद्दल होती. त्यातून सहानुभूती जाणवत होती.

आम्ही नानासाहेबांच्या बंगल्याच्या आवारात शिरलो, तेव्हा भिंतीच्या दर्शनी भागावरच कोळशाने 'हे घर झपाटलेल आहे.' असं बाळबोध अक्षरात लिहिलेलं दिसलं. तर आतल्या भिंतींवर अर्थबोध न होणारी उलटी सुलटी इंग्रजी अक्षरं खरडलेली होती. याचा अर्थ भानामती करणाऱ्या भुताला इंग्रजीच ज्ञान नव्यानंच होत होतं असं मला वाटून गेलं.

"हा विश्वास... विश्वास रेळे. मुंबईला असतो. विज्ञानाचा पदवीधर असून नुकतंच त्याने अंधश्रद्धा निर्मूलन मंडळ स्थापन केलयं. त्याद्वारे तो अशा विचित्र घटनांचा शोध घेऊन, लोकांना त्रासमुक्त करण्याचा प्रयत्न करतो आहे. अशी सुहासनं माझी ओळख करून दिली.

नानासाहेबांचा मरगळलेला चेहरा खुलला. त्यांनी सांगायला सुरुवात केली "हे सगळं सहा महिन्यांपूर्वी सुरू झालं. पहिल्यांदा लहान-लहान दगडं घराच्या कौलांवर येऊन पडायला लागले. वाटलं, गडी माणसांची मुलं खेळत असतात चुकूनमाकून मारत असतील. काही दिवसानंतर मोठे दगड येऊन पडायल लागले. कपबशा ठेवलेल्या जागेवरून आपोआप पडायला लागल्या. पाण्याच माठ, फुलझाडांच्या कुंड्या, चिनीमातीची भांडी न दिसणाऱ्या हातांनी फुटायल सुरुवात झाली. जेवणातल्या ताटात माती पडायला लागली. त्यामुळे बरेचद उपाशीच उठावं लागलं. स्वयंपाक घरात कुणीही नसतांना भांडी कोसळ् लागली...."

"माझ्या कित्येक भांड्यांना पोच पडले हो." नानासाहेबांच बोलणं तोडू आता अक्काबाई बोलू लागल्या, "अहो, माझ्या कपाटातल्या अगद कडी-कुलूपात असलेल्या साड्या आणि सुनीताचे फ्रॉक्सही काढून कैची कापून टाकलेले दिसले. बरेचदा हवा नसतानाही जळता दिवा विझला. एवढं नव्हे तर सुनीताचे केसही चाकूने कापले गेलेयत." असं म्हणून त्यांनी एक डब्यात भरलेले ते केस दाखवले. एक सुरेख टोप होण्याइतपत केस साठले दिसत होते.

"आणि त्या फाडलेल्या साड्यांचे तुकडे आहेत ना," अक्काबाई पुन्हा सां लागल्या, "त्यांच्या बाहुल्या केलेल्या सापडल्या. एवढं नव्हे तर बाहुल्यांशी क वागावं याविषयी लिहिलेल्या कागदांचे तुकडेही सापडले. एके दिवशी त स्वयंपाक घरात मीठ, मिरचीची पूड, पीठ आणि तांदूळ सगळंच एकत्र करू ठेवलेलं आढळलं. फाटलेल्या साड्या व फ्रॉक्स माळ्यावर अडगळी



सापडले. कुणी मेल्यानं आमच्यावर करणी केलीय देव जाणे." असं म्हणून त्यांनी डोळ्याला पदर लावला. वातावरणात एकदम तणाव जाणवायला लागला.

नानासाहेब समजावणीच्या सुरात म्हणाले, "अग, रडून काय उपयोग आहे ? आल्या परिस्थितीला धीरानं तोंड दिलंच पाहिजे. आपण काय प्रयत्न कमी केले ? मांत्रिक, भगत सर्वांना बोलावून झालं. भोग आहेत ते भोगले पाहिजेत."

मी नानासाहेबांना म्हटलं, "मला शोध घेण्याच्या प्रयत्नात तुम्ही सर्वांनी सहकार्य केलंत तर, काहीतरी वाट दिसू लागेल अशी आशा वाटतेय. मला तुम्हा प्रत्येकाशी एकेकट्यानं बोलावं लागेल. अर्थात् बरोबर सुहास असेलच. तुमची काही हरकत नाही ना ?"

"आजवर एवढे उपाय केले. त्यात तुमचाही उपाय करून पाहू" असं थोडंसं निराशेनेच नानासाहेब बोलले.

मी नानासाहेब, अक्काबाई आणि सुनीता ह्या तिघांना एकेकटं बोलावून एका खोलीत सुहाससह मुलाखत घेतली. सगळ्यात पहिली अट अशी होती की, जे घडताना डोळ्यांनी पाहिलंय तेवढच सांगायचं. इतरांनी सांगितलेल्या गोष्टी सांगायच्या नाहीत.

नानासाहेब व अक्काबाईच्या मुलाखतीवरून मला असं दिसून आलं की, सुनीताला त्यांनी ती सहा महिन्यांची असतानाच अनाथाश्रमातून आणली होती. त्यांचा विवाह होऊन बरीच वर्षे झाली व ते म्हातारे व्हायला लागले तरी, अक्काबाईची कूस उजवली नव्हती. त्यासाठीही बरेच अंगारेधुपारे करून झाले. पण, त्यांना डॉक्टरांकडे जाणं काही शेवटपर्यंत सुचलंच नाही. कारण डॉक्टरांपेक्षा धार्मिक आचार व रूढींवर त्यांचा गाढ विश्वास होता. शेवटी मूल दत्तक घ्यायचं ठरवलं. त्यांच्या ओळखीच्या अनाथाश्रमातून त्यांना ही पोर आवडली. मुलगी घरी आणली. तिला मात्र जन्माविषयीची काहीच माहिति अजूनही दिली नव्हती. त्यामुळे सुनीता त्यांनाच आपले खरे आई-वडील समजत होती.

सुनीताला कुणीही मित्रमैत्रिणी नव्हत्या. तिला अक्काबाई इतरांच्यात मिसळू देतच नसत. इतर मुलांकडून ती भलतं सलतं शिकेल अशा भीतीपोटी त्या तिला घराबाहेर पडू देत नसत. त्यामुळे ती एकलकोंडी बनली होती. ह्या अती काळजीमुळे तिची मानसिक वाढही खुंटली होती. परिणामी वयानं जरी ती पंधरा वर्षांची झाली असली, तरी अभ्यासात कच्ची होती.

सहा महिन्यांपूर्वी एके दिवशी सुनीता शाळेतून रडतच घरी आली. रडण्याचं कारण विचारल्यावर तिनं, शाळेतले वर्गमित्र नानासाहेब व अक्काबाई हे तिचे

खरे आई बाबा नाहीत असे चिडवीत असल्याचे सांगितले. तेव्हा दोघांनीही तिची समजूत काढून मुलं खोटं बोलताहेत असं सांगितलं. पण, नंतर सतत दोन तीन दिवस असाच चिडवण्याचा प्रकार झाल्यावर सुनीता शाळेत जायचं टाळू लागली. आणि शेवटी तिचं शाळेत जाणं बंद झालं. मुळातच एकलकोंडी असलेली सुनीता आता दिवसभर एकटीच घुम्यासारखी वावरू लागली.

शेवटी मी सुनीताला खोलीत बोलावलं. तिला माझ्या नाकावर टक लावून बघायला सांगितलं. मी मग तिला आश्वासक आणि मधाळ शब्दात प्रश्न विचारायला सुरुवात केली. तिने दिलेल्या उत्तरांवरून मला सगळ्याच कोड्याचा उलगडा झाला.

ज्यावेळेला सुनीताला तिच्या शाळेतील मित्रांकडून असं कळलं की, नानासाहेब आणि अक्काबाई तिचे खरे आईबाबा नाहीत, तेव्हा तिला प्रचंड मानसिक धक्का बसला होता. ज्यांच्यावर आपण जिवापाड प्रेम केलं, ते आपले कुणीच नाहीत; या जाणीवे मुळे ती 'स्किझोफ्रेनिक' या एका मानसिक रोगाची बळी झाली. तिला आणखीनच एकटं वाटू लागलं.

नानासाहेब आणि अक्काबाईंनी सांगितलेले सर्व प्रकार, त्यांच्या नजरा चुकवून सुनीताच करत होती. घरातील तिचा हात न पोहोचणाऱ्या व स्टूल घेऊनही हातात न येणाऱ्या वस्तूंना, वरच्या फळ्यांवर ठेवलेल्या चांगल्या कपड्यांनाही कुठेही ओरखडा पडला नव्हता. पण तिचा हात पोहोचणाऱ्या सगळ्या वस्तूंची तिने त्या झटक्यात वाट लावली होती. तिच्या सुप्त बालबुद्धीला असं वाटतं होतं की, असं काही केल्यामुळे ही मोठी माणसं आपल्यावर प्रेम करतील.आपली आणखी काळजी घेतील.

अक्काबाईच्या तिला वाढवण्याच्या पद्धतीमुळे, तिला खेळायला बाहुल्याही लहानपणी दिल्या गेल्या नसाव्यात. म्हणूनच ती त्या झटक्यात असताना कपडे फाडून त्यांच्या ओबडधोबड बाहुल्या बनवत होती. तसेच शाळेतील तिच्या मैत्रिणींप्रमाणे तिला केसांचा बॉबकट हवा असतानाही तो न करता आल्यामुळे ती स्वतःचेच केस कापत होती.

खरं तर ह्या सगळ्या गोष्टी ती जाणूनबुजून करत नव्हती. तिच्या नकळत ह्या सगळ्या गोष्टी सुप्त मनाच्या प्रभावामुळे घडत होत्या. तिचा बिचारीचा त्यात काहीच दोष नव्हता. कारण तिला माहीतही नव्हतं की, या सगळ्या गोष्टी आपणच करतोय म्हणून. दोष द्यायचाच झाला तर नानासाहेबांना व अक्काबाईंनाच द्यायला हवा. कारण तो दोष होता त्यांच्या विचार करण्याच्या पद्धतीचा आणि चुकीच्या समजुतींना कवटाळण्याचा.

नानासाहेबांना सगळी कल्पना देऊन, सुनीताला मानसोपचारतज्ञाकडे



नेण्याचा आणि त्या तज्ञांच्या सल्ल्याप्रमाणे वागण्याची सूचना देऊन मी व सुहास त्यांच्या घरातून बाहेर पडलो. भानामतीही त्या घरातून आता नाहीशी झाली होती. तसं पाहिलं तर भानामती नव्हतीच. हा होता तो 'स्किझोफ्रेनिया' या रोगाने पछाडलेल्या सुनीताचा मानसिक खेळ.

# बळी अंधश्रद्धेचे

"परवाच मी मुंबईतला मुकबधिरांच्या शाळेत गेलो होतो. तेथील शिक्षकांकडून त्या गरीब बापड्या मुलांच्या पालकांनी केलेल्या अंधश्रद्धाळू उपायांविषयी ऐकलं. अक्षरश: काळीज विदीर्ण झालं. अशिक्षित काय पण सुशिक्षितही भावनेच्या आहारी जाऊन सारासारविवेकबुद्धी गहाण टाकतात; हे यातून पुन्हा एकदा दिसून आलं. त्यांच्या करुण कहाण्या आज मी तुम्हांला सांगणार आहे." असं म्हणून विश्वासने कथानालेच्या शेवटच्या दिवसाचं पुष्प गुंफायला सुरूवात केली.

जितेंद्र सहस्त्रबुद्धे 'विश्वातील जिवांची उत्पत्ती' या विषयावर डॉक्टरेट मिळवलेला बुद्धिवान माणूस. लग्नानंतर त्यांना लवकर मूल झालं नाही. आणि जे झालं ते बहिरं होतं. अर्थात् त्याला ऐकता येत नाहीय हे कळायला त्यांना काही काळ जावा लागला. त्यांच्या संवेदनांना जेव्हा तो प्रतिसाद देत नाही असं कळलं, तेव्हां त्यांनी प्रथम डॉक्टरांकडे धाव घेतली. तज्ञांचा सल्ला घेऊन त्याला त्यांनी मूकबधिरांच्या शाळेतही घातलं. पण, मनात रुखरुख होती. त्याला व्यवस्थित ऐकायला यावं म्हणून ते मग मंत्रतंत्राच्या उपचारांकडे वळले.

कुणीतरी त्यांना सांगितले की, गोरेगावचा एक बाबा मुक्यांना बोलतं आणि बहिऱ्यांना ऐकतं करतो; म्हणून त्यांनी तिकडे धाव घेतली. बाबानं त्या मुलाला पाहिलं अन् काही मंत्र म्हणायला सुरुवात केली. मग त्याला आतल्या खोलीत घेऊन गेले. त्यांनी त्याच्या डोक्यावर एक विद्युतवाहक तार बांधली. आणि त्याच्या बाबांना म्हणजे जितेंद्र सहस्त्रबुद्धेंना सांगितले की, मेंदूतील श्रवण केंद्राला विजेचा धक्का दिला की, त्याला ऐकू यायला लागेल. असं म्हणून त्यांनी क्षणभर स्वीच ऑन केला. मुलगा जिवाच्या आकांताने त्या धक्क्यामुळे ओरडला. त्याच्या बाबांनीच त्याचे हात घट्ट पकडल्यामुळे त्याला हालचालही करता येत नव्हती. मेंदूला असंख्य झिणझिण्या आल्या आणि तो बेशुद्ध पडला.

बाबाने स्वीच ऑफ करून त्याच्यावर मंतरलेलं पाणी शिंपडलं. दोन दिवसांनी तुमच्या मुलाला ऐकायला येऊ लागेल. असं सांगून भरपूर दक्षिणा घेतली. सहस्त्रबुद्धेंचा मुलगा मात्र आजही बहिराच आहे.



सहस्त्रबुद्धेंच्याचसारखे दुसरे उच्च विद्या विभूषित राजपत्रित सरकारी अधिकारी- रमेश आंग्रे. त्यांचा राकेश सुरुवातीला कर्णबधिर नव्हता. दहा वर्षांचा असताना कानातील मळ काढणाऱ्या माणसाच्या चुकीमुळे तो बहिरा झाला होता. त्यांना स्पष्टपणे सांगितलं. पण राकेशला कुठल्याही प्रकारे उपाय करून ऐकायला यायलाच हवं. अशा अट्टाहासामुळे ते अवैज्ञानिक उपायांकडे वळले.

शेवटी राकेशचं बहिरेपण नाहीसं करण्याचा उपाय सांगणारा एक ज्योतिषी त्यांना भेटला. त्याने असं सांगितलं की, त्याच्या कानातला पडदा फाटला आहे. तो माझ्याकडे असलेल्या विशिष्ट प्रकारच्या मलमानं मी दुरुस्त करून देईन. मग पहा तुमच्या मुलाला अगदी लहानसा टाचणी पडल्याचा आवाज देखील ऐकू येईल.

ज्योतिषानं त्याच्या कानात घालायला एक चिकट मलम दिलं. ते सतत दहा दिवस कानात घालून झोपायला सांगितलं आणि आपली फी घेवून पोबारा गेला. तिसऱ्याच रात्री राकेश किंचाळून उठला. त्याचे बाबा काय झालं म्हणून त्याच्याकडे गेले. राकेश कान झाकत उभा होता. ते पहातात तो काय ! राकेशच्या कानाला मोठमोठ्या मुंग्या लागलेल्या होत्या व त्या त्याला डसत होत्या. त्याचा कान सुजून निघाला होता. कानातून रक्त यायला लागलं होतं.

महिपतची कहाणी तर चित्तरकथाच आहे. पाच वर्षांचं बापाचं छत्र हरवलेलं पोर ते. हातावर पोट असणाऱ्या त्याच्या अशिक्षित आईनं त्याला ऐकायला येत नाही म्हणून उपाय करण्यासाठी एका वैदूला गाठलं. वैदूनं महिपतच्या कानात भूत बसल्यामुळे, त्याला ऐकू येत नाही असं सांगितलं. त्याचा बहिरेपणा घालवण्यासाठी भूत उतरवण्याचा विधी करावा लागेल. असे सांगून त्याने दोनशे रुपये खर्च होईल असंही सांगितलं.

बिचारी ती अडाणीबाई घाबरली. तिनं दोनशे रुपयांचं कर्ज काढलं. वैदूनं भूत उतरवण्याचा विधी सुरू केला. प्रथम त्याला मंतरलेलं गोड पाणी प्यायला दिलं. एका शेगडीवर निखारे फुलवायला ठेवले. त्यावर गोमूत्र नि तुळशी पत्रांची आहुती दिली. मग चिमटा हातात घेऊन एक फुललेला निखारा उचलला आणि क्षणार्धात त्याच्या कानावर टेकवला. असं दोन तीनदा केलं. महिपत किंकाळ्या फोडू लागला. तेव्हा वैदू म्हणाला, "लई जबरी भूत आहे. बाहेर पडताना ते आसं रडणारच."

महिपतला एके दिवशी त्याची आई मूकबधिरांच्या शाळेत घेऊन गेली. त्या केसचा सहानुभूतीपूर्वक विचार करून बाईंनी त्याला शाळेत ठेवून घेतलं. आता

तो श्रवणयंत्र लावून ऐकू शकतोय. मात्र त्याच्या कानावरील भाजण्याचा डाग अंधश्रद्धेचा भयानकपणा ओरडून सांगतोय.

लिला ही एक मुकी मुलगी आहे. तीच्या मुकेपणावर, गिरणी कामगार असलेला तीच्या बाप मंत्रतंत्राच्या उपायांमागे लागलेला आहे तसा तो तीला मुकबधिरांच्या शाळेतही पाठवतोय. पण त्याचा विश्वास आहे भगतावर त्यासाठी तो दरवर्षी नियमितपणे गावची जत्रा करतो.

गेल्यावर्षी लिलेला घेऊन तो तीला जत्रेला असतांना त्याला एक भगत भेटला. त्यानं सांगितलं की, लिलानं देवाला सतत तीन वर्ष जत्रेला यायचं. प्रत्येक वेळी १०८ प्रदक्षिणा स्वता:भोवती गोलगोलफिरत देवाला घातल्या पाहीजेत. त्यावेळी मी मंत्रून दिलेल पान की, ज्यावर ॐ लिहिलेलं असेल, ते पान खात राहायचं. प्रदक्षिणा पूर्ण होई पर्यंत ते पान चघळलं पाहिजे म्हणजे ती फाडफाड बोलायला लागेल. झालं लिलानं तसा विधी केला. अन् मुंबईला परतली. आपल्या शाळेत जावू लागली. बाईंच्या प्रयत्नांमुळं तिला थोडे उच्चार येवू लागले. तिच्या आईबाबांना मात्र वाटत की ही त्या भगताची कृपा आहे. आता पुन्हा पुढच्या वर्षी जत्रेला जायचं म्हणताहेत.

लक्ष्मीचे आई वडील सधन आहेत. सारी सुखं हात जोडून त्यांच्याकडे उभी आहेत. पण एक दु:ख मात्र त्यांना सतत छळतंय. लक्ष्मीला बोलता येत नाहीय. ती मुकी आहे. तिला बोलतं करण्यासाठी त्यांनी अनेक उपाय केले, अंगारेधुपारे केले, गंडेताईत बांधले. पण अजूनही ती मुकीच आहे.

शेवटी कुलदैवताचा कौल लावण्यासाठी ते गावी गेले. कुलदैवताची यथासांग पूजा केली. त्यावेळी भटजींच्या अंगात आलं. तो म्हणाला, "तुमचा कुलपुरुष तुमच्यावर कोपलाय. त्याची दरवर्षी पूजा करायला यायला हवं. प्रत्येक वेळेस त्याला संतुष्ट करण्यासाठी एक कोंबडं आणि एक तोळा सोनं द्यायला हवं." लक्ष्मीचे आईवडील गेली पाच सहा वर्षं गावच्या वाऱ्या करताहेत. पण, लक्ष्मीत काही बदल घडलेला नाही ती अजूनही मुकीच आहे.

त्यांना कुणीतरी मुकबधिर शाळेत पाठवून पाहायचा प्रयत्न करायला सांगितलं. तेव्हा ते अनिच्छेनंच लक्ष्मीला घेऊन शाळेत गेले. शाळेतलं प्रसन्न वातावरण पाहून लक्ष्मीला शाळा आवडू लागली ती बाईंना सहकार्य करू लागली. आता ती हळूहळू बोलायला लागलीय. तिच्या आईबाबांना आता कुठे त्यांच्या कुलपुरुषाच्या कोपाचं इंगित कळू लागलय. अंधश्रध्देच्या आपण कसे आहारी गेलो होतो त्याची खंत वाटू लागलीय.



वामनरावांची शरयू जन्मापासूनच मूकबधिर आहे. त्यांची अशी ठाम समजूत आहे की, ग्रहणकालात त्यांच्या बायकोनं गर्भारशी असताना, हालचाल केली, भाजी चिरली, बिस्किटं खाल्ली; म्हणूनच शरयूला जन्मापासून अशा प्रकारचं व्यंग जडलंय. त्यावर उपाय म्हणून त्यांच्याकडे आलेल्या मांत्रिकानं त्यांच्या बायकोच्या जिभेवर व कानावर डाग दिले. पण बायकोला यातना होण्यापलीकडे काहीच फरक पडला नाही. शरयू आहे तशीच आहे. काय हा अजब न्याय आहे पहा, रोग शरयूला जडलेला आहे. पण अपाय मात्र तिच्या आईला भोगायला लागला.

तसाच रत्नांप्पांचा गणूही मुकबधिर आहे. त्यांना मात्र असं वाटतं की याला कारणीभूत आहेत त्यांचे भाऊबंदच त्यांच्या घराण्याचा रिवाज आहे की, घरात मुलं जन्मलेल्या दिवशी मासांहार करायचा नाही. पण भाऊबंदानी त्यांच्या गणूच्या जन्मदिवशी दुष्मनी करून, मांसाहार खाल्ला आणि उभा दावा साधला आहे. यावर काही उपाय ?

रघुनाथपंताचा मुलगा श्रीधर हा दहा वर्षांचा पोलिओग्रस्त आहे. त्याचे दोन्ही पाय पोलिओमुळं लुळे पडलेले आहेत. डॉक्टरांनी पोलिओ स्टीकचे बूट घेण्याचा सल्ला दिला व त्यात हळूहळू चालता येईल असे सांगितले. पण रघुनाथपंतांना त्यांचा मुलगा अपंग असण्याची कल्पनाच सहन होत नाहीय. त्यासाठी ते कुठलाही अघोरी उपाय करायला तयार आहेत. त्यांना त्यांचा मुलगा चालता हवाय.

एका बुवानं त्यांना तसं आश्वासन दिलंल. त्यावर उपाय सांगितला आणि एका रात्रीत तुमचा मुलगा चालायलाच काय पण धावायलाही लागेल असं छातीठोकपणे सांगितले. रघुनाथपंत आनंदले उपायही सोपा होता. एक रात्रभर श्रीधरला उकिरड्यात कंबरभर पुरून उभं ठेवणं बस्स.

बुवानं ठरलेल्या दिवशी पूजाविधी करून, श्रीधरला उकिरड्याच्या खड्ड्यात उभे केले. उकिरड्यावरील घाण वासाने श्रीधरचं डोकं भणाणायला लागलं. पण करतो काय ! त्याच्या बाबांचा सख्त पहारा होता. चार-पाच तासानंतर तो ओरडायला लागला, त्या उकिरड्यातून बाहेर पडायची धडपड करू लागला. अर्थातच अपंग असल्यामुळे हातापायांची जागच्या जागी हालचाल करण्या व्यतिरिक्त तो काहीच करू शकत नव्हता. त्याचा आक्रोश वाढू लागला. "मला वाचवा हो. या यातना सहन होत नाहीत." म्हणून श्रीधर विनवण्या करत होता. पण रघुनाथपंतानी त्याला उद्या चालता येईल या खोट्या आशेपायी त्याच्या रडण्याकडे दुर्लक्ष केलं. काहीकाळाने श्रीधर घशाला कोरड

पडून आणि यातना सहन न होऊन बेशुद्ध पडला. रघुनाथपंतांना वाटलं तो झोपी गेला.

सकाळ झाल्यावर त्याला उकिरड्यातून बेशुद्ध अवस्थेतच बाहेर काढण्यात आलं. आणि रघुनाथपंत घाबरेघुबरे झाले. उकिरड्यातील मोठमोठ्या किड्यांमुग्यांनी श्रीधरच्या पायांना चावे घेऊन सोलून काढलं होतं. काही ठिकाणी तर जखमा एवढ्या खोल झाल्या होत्या की आतील हाडं दिसू लागली होती. धावपळ करून त्यांनी श्रीधरला डॉक्टरकडे नेलं. डॉक्टर म्हणाले, "आता पाय कापण्याशिवाय पर्याय नाही. जखमा प्रचंड आहेत. त्यात पू होऊन संपूर्ण शरीरभर विष पसरू शकेल. मग मुलगाही हातचा जाईल." कोण समजावणार या रघुनाथ पंतांना ?

थोड्याफार फरकानं अशीच घटना घडली रामरावांकडं. त्यांचा मुलगा महिर एके दिवशी शाळेतून आला तो एका डोळ्यानं दिसत नाही अस बडबडत. डोळ्यासमोर पांढरा पडदा आल्यामुळे त्याला काहीच दिसत नव्हतं. लागलीच रामराव गावातल्या वैदूकडं गेले. तो बाहेरगावी गेल्यामुळे एका अनोळखी वैदूला पकडून आणलं.

त्या वैदूनं दाभणासारखी एक सुई तापवली अन् पटकन् डोळ्यात घालून बाहेर काढली. महिरला कळ आली. पण थोड्याच वेळात त्याला दिसू लागलं रामरावांनी वैदूला आनंदाने शंभर रुपये दिले. पण पुन्हा दोनचार दिवसांनी महिर आंधळा झाला त्याच्या डोळ्यातून पू बाहेर येवू लागला. शेवटी ऑपरेशन करून तो डोळा काढावाच लागला. आणि महिर जन्मभर एकाक्ष झाला.

**

अशा किती सांगाव्यात अंधश्रध्देच्या भयाण कहाण्या !



# दहा पैशाचं नाणं

कथामाला कालच संपली होती. एकंदरीत कथामालेला जनतेचा उत्तम प्रतिसाद मिळाला होता. अनेक लोक चेवून विश्वासच अभिनंदन करत होते. विश्वासने स्थापन केलेल्या 'अंधश्रद्धा निर्मूलन मंडळा'ला मदत करायला तयार आहोत असे अनेकांनी त्याला व्यक्तीशः सांगितल.

ह्या सगळ्या अनुभवाने विश्वासला हुरुप आला होता. त्या ओघघात त्यानं दोन महिन्यापूर्वी घडलेली घटना कार्यकर्त्यांना सांगायला सुरवात केली.

'अरे गणपा, लवकर धावत इकडे ये. गावाच्या वेशीवर बघ गर्दी झालीय.' रमेश कुजबुजला.

'काय रे, काय झालं गर्दी जमायला? अन् तू एवढा धापा टाकत काय आलायस ?'

'गावकुसावर एक बाबा आलाय. काय त्याचे तेज ! काय त्याची चर्चा ! ! काय त्याचं बोलणं ! ! !

आपण तर बुवा दिपूनच गेलो त्याला बघून. काय रसाळ वाणीनं बोलतो तो. गावची सगळी बडी बडी मंडळी जमलीयत. चल, येतोस का तू बघायला.'

'थांब थोडा. मी आता कामात आहे. थोड्या वेळाने जाऊ...'

'अरे, तू वेडा की खुळा ! तुझं काम नंतर केलं तर फारसं बिघडणार नाहीय. तो बाबा निघून गेला तर मात्र तुझं भलतंच नुकसान होईल. त्याच्याकड दैवी शक्ती आहे. तो चमत्कारही करून दाखवतो म्हणे ! त्याची तुझ्यावर कृपा झाली तर तो तुझी सर्व दुःखं एका झटक्यात नाहीशी करुन टाकील बघ.'

चमत्काराचं ऐकल्याबरोबर गणपाला राहावेना. त्यानं तडक आपलं काम बाजूला सारलं अन् तो निघाला रमेशबरोबर बाबाकडं. जाता जाता त्यांच्या चमत्कार आणि बाबाविषयीच गप्पा चालल्या होत्या. कोणकोण जमलंय, काय करताहेत इ. माहिती गणपा रमेशला विचारत होता. होता होता ते गावकुसाजवळ आले.

गावकुसाजवळ असलेल्या म्हसोबाच्या देवळाच्या अंगणात गर्दी जमलेली दिसत होती. जवळ गेल्यावर त्यांच्या लक्षात आलं की, आपण घाईघाईत हार व

नारळ घ्यायला विसरलोय. पण आता परत जाऊन येण्यात वेळ होणार होता. ते तसेच पुढे झाले. त्यांना दिसलं की, गावचे पाटील, बडे बडे व्यापारी, गावच्या मुख्य देवळाचे पुजारी इ. मंडळी जमली आहेत. धुपाचा वास दरवळतोय. बाबाला सगळे नमस्कार, नव्हे लोटांगणं घालताहेत. हळूहळू आवाजात आपले प्रश्न.. आपल्या चिंता त्यांना सांगितल्या जात आहेत. बाबा धीरगंभीर मुद्रा करून, ध्यानस्थ योग्याप्रमाणे बसले आहेत. ह्या सर्व वातावरणाचा त्यांच्यावर परिणाम न झाला तरच नवल.

गणपा धावतच बाबांजवळ गेला अन् त्याने त्यांना साष्टांग नमस्कार घातला. त्यांचे पाय चुरू लागला. तो बाबांना सद्गदित स्वरात म्हणाला, 'बाबा, माझ्यावर कृपा करा. मी मोठ्या संकटात आहे. माझ्या मुलीचं लग्नच होत नाहीय. माझे जोडे झिजून झिजून पाय मोडायची पाळी आली आहे.'

बाबांनी त्याला हळुवारपणे उठवलं. त्याच्याकडे नजर रोखून पाहू लागले. त्यांची ती भेदक नजर पाहून आपोआपच गणपा खाली पाहू लागला. त्यांच्या नजरेला नजर देणे त्याला जमलंच नाही. त्यामुळे तो आणखीनच भारावला. बाबांनी त्याच्या डोक्यावर हात ठेवला. तथास्तु केल्याप्रमाणे. गणपाला बरं वाटलं. बाबांची आपल्यावर कृपा झाली म्हणून तो समाधानी झाला.

'बालका, तुझ्याकडे दहा पैसे मिळतील?' बाबांनी हळुवार पण भरदार आवाजात विनंतीवजा आज्ञा करीत विचारलं.

गणपाने पटकन आठ आण्याचं नाणं काढून दिलं.

ते पाहुन बाबा जरबेच्या आवाजात म्हणाले,'बालका, मी फक्त दहा पैशाचंच नाणं मागितलं. तर तू मला आठ आणे देऊ करतोस. मी काय भीक मागितली होय?'

त्याचं बोलणं ऐकून गणपा भांबावला. त्याला काय करावं ते सुचेना. आजूबाजूची मंडळीही हा काय उद्धट आहे अशा नजरेने त्याच्याकडे पाहू लागली. ते पाहून तो आणखीनच संकोचला.

त्याची ही अवस्था पाहून बाबा पुन्हा हळुवार आवाजात मार्दवाने म्हणाले, मी गरिबांची सेवा करण्याचं व्रत घेतलं आहे. गोरगरिबांना लुटण्याचं नाहीय. आज तुम्ही मला आठ आणे द्याल. उद्या रुपया परवा आणखी काही. पण तुमच्याकडचं धन मला नकोय. गरिबांची सेवा हीच माझी ईश्वरचरणी सेवा आहे.'

त्यांचं हे वक्तव्य ऐकून गावकरी त्याच्यांकडे आणखीनच आदराने पाहू लागले. आपल्या गावचं भाग्य मोठं म्हणूनच हे बाबा आपल्या गावात आले आहेत अशी त्यांची भावना झाली. पाटलांनी तात्काळ त्यांच्या जवळील १०



पैशाचं नाणं बाबांना देऊ केलं पण त्यांनी ते नाकारलं. त्यांना गणपाजवळूनच ते नाणं हवं होतं. त्यांच्या इच्छेला मान देऊन गणपाने त्यांना दहा पैशाचं नाणं दिलं.

क्षण दोन क्षण बाबा ध्यानस्थ बसले. हातातील नाण्यावर फुंकर मारुन काही मंत्र पुटपुटले मग गणपाच्या हातात नाणं देत म्हणाले, 'हे नाणं थोडावेळ मुठीत बंद करून ठेव. मी सांगेन तेव्हा मूठ उघड.'

थोड्या कालाने बाबांनी त्याला मूठ उघडायला लावली. अन् तो हाताकडे अचंब्याने पाहतच राहिला. बाबांच्या पायावर पडून रडू लागला. गावकऱ्यांना कळेना हा एकदम असं का करतोय ते.

'बाबा, तुम्ही माझ्यावर कृपा केलीत. मी धन्य झालो, माझं आयुष्य सार्थकी लागलं.' रडत रडत गणपा म्हणत होता, 'बाबा, आता मी तुमच्या सेवेत रहाणार. मला सोडून जाऊ नका. माझ्या घरी या. तिथं तुमची चांगली व्यवस्था ठेवीन.'

'बालका, अरे, मी संन्यासी माणूस. मला ह्या मोहमायेचा स्पर्शही नकोय. मी आपला इथेच बरा आहे. ठेविले अनंते तैसेचि राहावे ! ही शिकवण लक्षात ठेव.'

गावकऱ्यांमध्ये अजुनही कुतूहल होते. ते गणपाच्या हाताकडे पाहण्यासाठी धडपडू लागले. गणपाने सर्वांना आनंदाने हात दाखवत सांगितले,

'पहा, पहा बाबांची सिध्दी ! ह्या नाण्यातून भारंभार विभूती येत आहे. ही विभूतीच आता माझं रक्षण करील.'

धडाधड गावकऱ्यांनी बाबांना लोटांगण घालायला सुरुवात केली. हां हां म्हणता बाबांच्या चमत्कारांची, सिध्दीची वार्ता सर्व पंचक्रोशीत पसरली. पहाता, पहाता राम मंदिरात एक मोठा मठ स्थापन झाला. गावची अवकळा नाहीशी होऊन, नेतेमंडळीही बाबांची सेवा करायला हजर होऊ लागली. बाबांची आपल्यावर कृपा व्हावी म्हणून बाबांना सुख स्वास्थ्य देण्यासाठी सर्व काही देण्याची लोकांमध्ये अहमहमिका लागू लागली. बाबांच्या मठाचा बोलबाला दिवसेंदिवस वाढू- पसरू लागला.अधूनमधून मंत्रीही येऊ लागले. एवढेच नव्हे तर जिल्ह्याचे कलेक्टर, पोलीस इन्स्पेक्टर, डॉक्टर मंडळीही आपलं जाणं-येणं वाढवू लागली. प्रत्येकाच्या समस्यांचं बाबा निवारण करत होते.

काही लोकांच्या समस्या सुटण्याऐवजी वाढल्याच होत्या. पण त्या लोकांना वाटत होतं की, आपण मागच्या जन्मी भरपूर पाप केलंय. म्हणून ह्या जन्मी हे भोग भोगलेच पाहिजेत. त्याला बाबा काय तरी करणार? कारण बाबांच्या कृपाप्रसादाने वांझ स्त्रियांनाही मुलं झाली होती. काही लोकांच्या मुलाबाळांना नोकऱ्याही बाबांमुळेच मिळाल्या होत्या. तर काहीचे धंदेही जोरात चालू लागले

होते. हे सर्वांना दिसलं होतं. म्हणून समस्या न सुटलेली मंडळीही पुन्हा पुनः बाबांकडे वारंवार जात होतीच.

-एक दिवस अचानक गावात बातमी पसरली. बाबांच्या मठात राघूशेठची तरणीबांड गोरीगोमटी नात मेलेली सापडली. गावात खळबळ माजली. पण बाबांनी आपल्या 'सिद्धी' च्या जोरावर सारं प्रकरण दाबून टाकलं. पुन्हा सारं काही आलबेल झालं.

पण ह्या प्रकरणानंतर गावातील काही शिकलेल्या तरुण मंडळींना बाबांच्या मठाबाबत शंका येऊ लागली. ते गावकऱ्यांना आपली शंका सांगण्याचा प्रयत्न करू लागले. गावकरी मात्र त्यांना वेड्यात काढत होते. 'उगंच चार बुकं शिकली महणजे जादा अक्कल आली, असं होतं काय ?' असे प्रश्न विचारुन गावकरी त्या तरुणांना निरुत्तर करीत होते. एवढी मोठी मंडळी बाबांच्या भजनी असताना त्यांच्या विरोधात जाणं हे तरुणांनाही आव्हान होतं. ते आपापसात कुजबुजत होते पण उपाय सापडत नव्हता. बाबांच्या खोटेपणाविषयीची माहिती त्यांच्याकडे पुराव्यानिशी जमत होती. पण उघडपणे त्यांच्याविरुद्ध ते काहीच करू शकत नव्हते. पोलिसांकडे जाणं हा मूर्खपणाच ठरला असता. कारण खुद्द पोलीस इन्स्पेक्टरच बाबांच्या मर्जीतले होते. त्यांनीच ह्या पोरांना बंद करून टाकलं असतं. पोरं मात्र गावकरी फसवले जात आहेत म्हणून दिवसागणिक अस्वस्थ होत होती.

काही महिने असेच गेले. शिवरात्र आली. शिवमंदिरात गावची जत्रा भरली. दिवस संपता संपता गावात बोंब उठली. हिमालयात बारा वर्षे तपश्चर्या करून आलेले बाबा महानंद गावात आले आहेत. गावच्या भव्य पटांगणात ते आसनस्थ झाले आहेत. सारा गाव त्यांना पहाण्यासाठी आपापल्या घरादारातून बाहेर पडला.

जवळपास सारा गाव जमलेला पाहून बाब महानंदांच्या शिष्याने बोलायला सुरुवात केली-

'सज्जनहो, आपल्या गावाचं भाग्य थोर, म्हणूनच आज शिवरात्रीच्या दिवशी बाबा महानंदाचा पदस्पर्श आपल्या गावात झाला आहे. हिमालयात तपश्चर्या करून बाबांनी अनेक मंत्र व सिद्धी प्राप्त केल्या आहेत.

शिष्याचं बोलणं चालू असतानाच, गावातील पूर्वीचे बाबा तिथं अवतीर्ण झाले. त्यांनी एकंदर परिस्थिती न्याहाळली. त्यांना कळून चुकले की जर ह्या नव्या बाबांचं बस्तान बसलं तर आपली काही धडगत नाही. ह्याला कसंही करून पिटाळला पाहिजे.

थोडासा विचार केला अन् गावातल्या बड्या मंडळीची साथ पाहून त्यांनी ह्या नव्या बाबांना आव्हान दिलं.

ते जोरात ओरडून म्हणाले, 'अरे, तपश्चर्येच्या गोष्टी करतोस...तू मंत्रसिद्धीच्या गोष्टी करतोस तर मग मला जी सिद्धी प्राप्त झाली आहे; ती करून दाखव.'

महानंद बाबा गालातल्या गालात हसले. त्यांच्या शिष्याने ती खूण ओळखून लगेच गावकऱ्यांना सांगितले, 'तुमच्यापैकी कुणीही मला दहा पैशाचं नाणं द्या. आमचे बाबा त्यातून विभूती काढून दाखवतील.'

गावकरी जरा चक्रावलेच. ह्या बाबांनी मंत्रसिद्धी न सांगताही; ती कोणती असेल हे महानंदांनी कसं काय ओळखलं बरं असा प्रश्न ही पडला. बाबा महानंदाच्या अंतर्ज्ञानावर काही गावकरी खूषही झाले. त्यांना वाटू लागले की, हे बाबा आपल्या जुन्या बाबांपेक्षाही मोठे असले पाहिजेत. ताबडतोब एका गावकऱ्याने दहा पैशाचं नाणं त्या शिष्याला दिलं. शिष्याने ते नाणं पाण्यात पवित्र करून बाबांच्या हाती दिलं. बाबांनी मंत्र पुटपुटला आणि नाणं शिष्याच्या हाती परत सोपविलं. शिष्याने ते नाणं गावकऱ्याच्या हाती दिलं. गावकऱ्यांनी पाहिलं तर खरंच त्या नाण्यातून विभूती येत होती. गावकरी महानंदावर खूष झाले. ते आपापसात उलटसुलट चर्चा करू लागले. तेवढ्यात त्यांना शिष्याचा आवाज पुन्हा ऐकू आला.

'भक्तगणहो हा चमत्कार तर काहीच नाही. ह्यापेक्षा वरचढ चमत्कार बाबा तुम्हाला करून दाखवणार आहेत.'

मग बाबांनी, मंत्राग्नी पेटवणे, आग खाणे, शरीरातून सुया आरपार खुपसणे, नोट जाळून पुन्हा त्याच नंबरची नोट निर्माण करणे, रिकाम्या हातातून शिवलिंग काढणे, तांदळाने भरलेला लोटा अधांतरी तरंगवणे असे अनेक चमत्कार करून दाखवले. सारे गावकरी प्रत्येक चमत्कार मंत्रमुग्ध होऊन पहात होते.

गावकरी आपल्या कह्यात आलेले पाहून शिष्याने आता जुन्या बाबाला आव्हान दिले, की त्याने हे सर्व चमत्कार करून दाखवावेत. त्यावर गावकऱ्यांनीही त्यांना आग्रह करण्यासाठी त्यांच्याकडे पाहिले, तो बाबा त्या गर्दीत नव्हतेच. ते केव्हाच ह्या गडबडीत पसार झाले होते. काही गावकरी त्यांना त्यांच्या मठात शोधण्यासाठी गेले. पण मठही पूर्णपणे रिकामा झाला होता. सगळी चीजवस्तू घेऊन बाबा पळून गेले होते. गावकरी पुन्हा पटांगणात आले. आणि सारी हकीकत शिष्यांना ऐकवली.

गावकऱ्यांना समजावण्याची हीच संधी आहे; हे पाहून महानंदबाबांनी आपल्या डोक्यावरील केसाचा टोप उतरवला.

"अरे, हा तर पाटलाचा मुलगा. ह्याने आपल्याला बनवलं की."

गावकऱ्यांनी एकच गिल्ला करायला सुरवात केली. ताबडतोब खड्या

आवाजात त्याने सर्वांना शांत रहाण्यास सांगितले.

"गावकरी हो, मी बाबांचा वेश घेऊन तुम्हाला फसवलं, त्याबद्दल प्रथम तुमची माफी मागतो. पण ह्या खोट्या बाबाला गावातून पळवून लावण्यासाठी आमच्याकडे दुसरा कुठलाच उपाय नव्हता. तुम्हाला सरळ सरळ सांगून पटलंही नसतं. पण ह्या बाबाच्या अनेक काळ्या कहाण्या आमच्याकडे पुराव्यानिशी उपलब्ध आहेत. ह्यात गावची बडी बडी मंडळी गुंतली आहेत. त्यांचे अनेक हितसंबंध गुंतले आहेत. पण आम्ही त्यांना दोष देत नाही. आयुष्यातील सुखाचा 'शॉर्टकट' शोधण्याच्या नादात ते फसले. पण त्यांना खोट्या प्रतिष्ठेच्या दबावामुळे उघडपणेही बोलता येत नव्हतं. ह्या बाबाने आपल्या गावची धनदौलत, एवढंच नव्हे तर मुलं देतो ह्या नावाखाली आपल्या आयाबहिणींनाही लुटलं. हे सगळं कसं मोठ्यांच्या पाठिंब्यामुळे बिनबोभाट चाललं होतं. आम्हाला मात्र गावची ही अधोगती बघवेना. म्हणूनच योग्य संधीची आम्ही वाट पाहत होतो त्यासाठीच हे सोंग घेणं भाग पडलं.'

'आरं, ती विभूती कशी काय काढली ते सांग की.' गर्दीतून एक आवाज आला.

'काही विशेष नाही. मी हातांना एक विशिष्ट रसायन लावलं होतं. त्याची फक्त अल्युमिनियमवरच क्रिया होते. म्हणूनच मी दहा पैशाचं नाणं मागितलं.'

'आरं तिच्या, म्हणूनच त्यो बाबा गणपाकडून त्या दिवशी आठ आण्याचं नाणं घ्यायला तयार नव्हता. अन् म्हणे मी गरीबांचा बाबा. वारं वा !' गर्दीतून एक आवाज घुमला.